*नेहरू बाल पुस्तकालय*

# भारतातील बहादुर मुले

**सिगरून श्रीवास्तव**

अनुवाद

**जगदीश काबरे**

चित्रे

**रवि परांजपे**



**नेशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# अनुक्रमणिका



नेर्मला, सयाल आणि अजगर 5



एका क्षणाची कहाणी 15



मी जळत आहे 23



मृत्यूचे सावट 33



हे महिमामयी माते, माझं रक्षण कर 43



काळोख्या रात्रीतील संघर्ष 52

## १. निर्मला, सयाल आणि अजगर

निर्मलाला सगळ्या मैत्रिणींमध्ये सयाल बिलकूलही आवडत नव्हती. त्याला कारणही तसंच होतं. सयालच्या गुणांचं आणि वागणुकीचं सर्वत्र कौतुक व्हायचं. हे निर्मलाला कसं सहन व्हावं ? सयालचं संपूर्ण नाव होतं सयाल लहानुभाऊ भोया. तिच्या आईला सगळे म्हणायचे, ''तुमची मुलगी खूपच हुशार आहे हं ! तिचं हसणं तर इतकं गोड आहे की, त्यामुळे ती सगळ्यांना आपलसं करून टाकते.'' ''गोड हसणं ? हुं....'' निर्मला चरफडत मनात म्हणायची, '' सगळी बत्तीशी दाखवून तर हसते आणि म्हणे गोड हसणं !''

वरवर निर्मला काहीही म्हणत असली तरी मनोमन तिला हे पटत होतं की, सयाल खरंच खूप गोड हसते. जेव्हा ती हसायची तेव्हा तिचा लंबगोल चेहरा खूपच प्रसन्न होत असे. तिच्या डोळ्यात एक वेगळी चमक दिसायची. हसताना तिचं नकटं नाक वर उचललं जायचं आणि तिच्या गालावर सुंदर खळ्या पडायच्या.

सयालचं हसणं जरी मोहक होतं, तरी ती दिसायला अगदी सामान्य होती. तिची परिस्थितीही खूप गरीब होती. कपड्यांना लावलेल्या ठिगळांतून तिचं दारिद्र्य डोकावून पाहात होतं. तिच्या हस्तिदंती बांगड्याही निर्मलाएवढ्या सुंदर नव्हत्या. निर्मलाच्या गळ्यातही सुंदर मोत्यांची माळ होती. तशी माळ गुजराथमधल्या त्या छोट्याशा बरटाड गावात कुणाजवळही नव्हती. त्या माळेत लाल रंगाचे मोती लाल रंगाच्या धाग्यातच ओवले होते. एकदा त्या दोघी ओढ्यावर कपडे धुवायला गेल्या होत्या, तेव्हा सयालने तिच्या माळेचं खूप कौतुक केलं होतं. ती म्हणाली, '' निर्मला, तुझी माळ किती सुंदर आहे. जरा बघू तर खरं ?'' पण निर्मलाने तिच्याकडे पाहिलंही नाही. आणि रेटीत दुसरीकडे मान वळविली. आपण काही ऐकलंच नाही अशा थाटात ती दगडावर जोरजोरात कपडे आपटू लागली.

'' अगं, जरा बघ तर...'' सयाल म्हणाली.

'' ती बघ चिमणी बसली आहे.''

'' ती चिमणी थोडीच आहे ? तो तर विणकर पक्षी आहे.''

'' नाही निर्मला. ह्या पक्ष्याच्या पोटाचा रंग पिवळा आहे. तो विणकर कसा असेल ?''

निर्मलाने त्या पक्ष्याला परत एकदा नीट न्याहाळून पाह्यलं, तर खरंच ती चिमणी होती. निर्मला मनातल्या मनात चरफडली. परत सयालच जिंकली होती. तिला ह्या गोष्टीचाही खूप संताप यायचा की, नेहमीच कसं सयालचं बरोबर येतं ? ती स्वत:ला जरा शहाणीच समजते नाही तरी ! गावातला एकमेव सुशिक्षित माणूस कोण असेल तर ते प्राथमिक शाळेचे मास्तर. सयालला शाळेत जायला खूप आवडायचं, तर निर्मलाचं अगदी उलट होतं. शाळा चुकवून घरी केव्हा जायला मिळेल ह्याची ती वाट पाहत असे.

'' निर्मला.... ए निर्मला ... '' घरातून तिच्या आईने हाक मारली. '' हे बघ, आठ वाजत आलेत, उन्हं डोक्यावर आलीत. आज गुरांना चरायला नेणारंही कुणीच नाहीयं घरात. आज तूच जाऊन ये गुरं राखायला. शाळेत काय, उद्याही जाशील.''

निर्मलाचा आनंद गगनात मावेना. ती लगेच गुरांना घेऊन नाचत नाचत पाय वाटेने निघाली सुद्धा. गावाच्या वेशीवर एक मोडकी - तोडकी झोपडी होती. त्यात २ - ४ जुनी भांडी इकडे - तिकडे पसरली होती. एक मरतुकडं कोबडं अन्नाचे कण शोधत फिरत होतं. त्या झोपडी समोर एक नऊ वर्षाची मुलगी तांदूळ निवडत बसली होती. तिच्या जवळच तिचा लहान भाऊही बसला होता. '' विजय, कच्चे तांदूळ खायला तू काय चिमणी आहेस ?'' तिने त्याला दटावलं. उत्तरादाखल छोटा फक्त हसला. त्यावेळी त्या मुलीचं लक्ष निर्मलाकडे गेलं आणि ती तिच्याशी हसली. '' निर्मला ! आज तू कशी काय गुरांना घेऊन ?''

निर्मलाने मुद्दामच तिच्याकडे पाह्यलं नाही. कारण ती मुलगी सयालची मैत्रीण होती.

'' घाटाकडे का जात नाहीस ? सयाल पण आज गुरांना घेऊन तिकडेच गेली आहे.''

निर्मलाला जरा संतापच आला. ती स्वत:शीच म्हणाली, '' चारपाच बकऱ्या तर आहेत सयालकडे. आणि त्याला ही मुलगी '' गुरंढोरं '' म्हणतेय.'' निर्मलाला सयाल तिच्यापेक्षा कुठेही वरचढ असलेली सहन होत नव्हती. नंतर खोटं - खोटं हसत म्हणाली,

'' एवढ्या दूर जाऊ, मीराबाई ?''

काही अंतर चालल्यावर निर्मलाने घाटाकडे जाणारी वाट सोडली आणि ती जंगलाकडे जाणाऱ्या रस्त्यावरून चालू लागली. तिथे तिला थोडी मोकळी जागा दिसली. तिथे तिची गुरं आरामात चरू शकत होती.

जंगलात खूपच कुबट वास येत होता. आणि गरमही खूप होत होतं. निर्मलाच्या डोक्यावर डासांनी पिंगा घातला होता. पक्ष्यांच्या कलकलाटाने सगळं जंगल भरून निघालं होतं. हळूच एक खारूताई आली आणि पिंपळाच्या झाडावर चढली. एक धनेश पक्षी आपले मोठे मोठे पंख फडफडवत उडून गेला. त्याच्या काळ्या पांढऱ्या पंखांसाठी निर्मलाने इकडे तिकडे पाह्यलं. पण तिला काही ते मिळाले नाहीत. शेवटी निराश होऊन तिने एका म्हशीला ढुशी दिली. 'हुं.. हुं.. चल.. चल !'

जेव्हा ती मोकळ्या हवेत पोहोचली, तेव्हा समोरचं दृश्य पाहून ती संतापली. कारण ती नेहमी ज्या झाडाखाली बसत असे, त्या जागी आज आधीच कुणीतरी येऊन बसलं होतं. आणि सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे झाडाला टेकलेल्या पाठीकडे पाहून तिला हे कळलं होतं ती नक्की सयालच आहे. सयाल दोही गुडघ्यांवर डोकं ठेवून दिवास्वप्न पाहाण्यात रंगली होती. तिने डोक्यावरून पदर घेतला होता, पण तो डोक्यावर फाटला होता आणि फक्त तिचा अंबाडाच झाकला गेला होता.

गुरांच्या घंटाचा आवाज ऐकून तिने इकडे तिकडे पाह्यलं. निर्मलाला बघून तिला खूपच आनंद झाला. दोन्ही हातांनी खुणावत ती तिला हाका मारू लागली. ''निर्मला... ए निर्मला... इकडे ये. इकडे खूप सावली आहे.''

नेहमीप्रमाणे निर्मलाने तिच्याकडे दुर्लक्ष केलं. आपल्या गुरांना हाकत राहिली. मनात म्हणत होती, ''मी घाटाकडे जाईन, नाहीतर दुसरीकडे जाईन पण जिथे सयाल आहे तिथे मुळीच जाणार नाही.''

''ए निर्मला, ये ना. मी तुला एक गंमत दाखवते.'' सयालने तिला हाक मारली.

''काय गंमत असणार आहे तुझी ? तुझ्या गंमती म्हणजे शाळेसारख्याच नीरस आणि कंटाळवाण्या असतात.'' असं रागाने पुटपुटत निर्मला घनदाट जंगलाकडे वळली. तिथे गुडघ्याएवढं उंच गवत वाढलेलं होतं. तिची गुरं कोवळ्या गवताच्या शोधात इकडे तिकडे विखुरली गेलीत. निर्मलासुद्धा बसायला जागा शोधू लागली. थोड्या अंतरावर तिला एक झाड दिसलं, ज्याखाली ती आरामात बसू शकत होती. उंच

गवतातून चालत ती त्या झाडाजवळ आली.

''ए निर्मला ! इकडे का येत नाहीस ?'' सयालने तिला एकदा हाक मारली. निर्मलाने चिडून तिच्याकडे पाहिलं आणि नाक मुरडलं.

''फुस्स.. स..स. '' अचानक हा फुत्कार ऐकून तिच्या हृदयाचं पाणी पाणी झालं. तिने मागे वळून पाह्यलं आणि तिचा तिच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. एक प्रचंड अजगर तिच्याकडे जळजळीत नजरेने रोखून पाहात होता. दहा - बारा फूट लांबीचा तर तो नक्कीच असावा. त्याच्या डोक्यावर मणी असल्यासारखं वाटत होतं. त्याच्या पिवळ्या धम्मक पोटावर काथ्या रंगाच्या पट्ट्या होत्या. तो निर्मलाच्या इतक्या जवळ होता की, तिला तिथून पळायचेही भान राहिले नाही. घाबरून तिने दोन्ही हातांनी आपले तोंड झाकून टाकले. तिला ओरडावसं वाटत होतं. पण तिच्या तोंडून शब्दच फुटत नव्हते. अजगराने जणू तिला भुरळच घातली होती. ती एकटक त्याच्या डोळ्यांकडे पाहात होती. अचानक सापाने फुत्कार केला आणि उडी मारली. असलं भयानक दृश्य तिने आपल्या आयुष्यात कधी पाह्यलं नव्हतं आणि ऐकलंही नव्हतं. तिला परत ओरडावसं वाटलं. पण त्या'सर्पाने जणू तिला संमोहित केले होते. अशाही परिस्थितीत तिला लक्ष्मीबाईच्या सर्पाच्या आणि मगरीच्या गोष्टी आठवल्या. तिला वाटलं, त्या सगळ्या गोष्टी खऱ्या आहेत. सर्प खरोखरच माणसांना संमोहित करतो.

अचानक त्या सर्पाने आपलं डोकं आणि शेपूट एकाचवेळी उचललं. पापणी लवते न लवते तोच तिचे पाय अजगराच्या विळख्यात फसले. आणि त्याने जबड्यात तिचा हात पकडला. त्याची मिठी इतकी घट्ट होती की, निर्मलाला वाटलं आपल्या हाडांचा जणू चुराच होतोय. आता तिला वेदना असह्य झाल्या आणि ती ओरडू लागली. वेदनांपेक्षाही हा साप आता आपल्याला खाऊन टाकेल ह्या भीतीनेच ती अर्धमेली झाली होती. तिला वाटलं आता काही आपण वाचत नाही. शेवटच्या प्रयत्न म्हणून ती सर्व शक्ती एकवटून ओरडली, ''वाचवा... वाचवा....''

निर्मलाने सापाला झटकायचा प्रयत्न केला. पण त्याला स्पर्श करायचं धाडस काही तिला झालं नाही. तेवढ्यातही तिला आठवलं लोकं म्हणतात, सापाला हात लावला तर अंगावर कोड उठतं. तिला लक्ष्मीबाई सांगत होत्या तेही आठवलं की, काही काही साप माणसांनाही गिळतात. ह्या प्रचंड अजगराकडे पाहून तिची खात्री पडली.

तिने घाबरत घाबरत त्या सापाकडे पाह्यलं. तो तिला आणखी एक विळखा घालणारच होता, एवढ्यात त्याच्यावर कुणीतरी काठीने वार केला. हा वार सयालने केला होता. ती आतापर्यंत तिथे येऊन थडकली होती. एकसारखे आणि अगदी निर्दयपणे ती त्याच्यावर काठीचे वार करत होती. आणि त्याला मारू पाहात होती. अजगर भयानक संतापला पण त्याची पकड काही ढिली झाली नव्हती.

"सयाल.. सयाल... मी मेले गं !"

"काही होणार नाही. घाबरू नकोस," सयाल म्हणाली आणि अतिशय निर्भिडतेने ती विळखा सोडवायचा प्रयत्न करू लागली.

"मला ह्याचं विष चढतयं गं !" निर्मला म्हणाली.

"अगं, हा तर अजगर आहे. हा विषारी नसतोच मुळी."

"पण मला तर हलताही येत नाहीयं."

"हे बघ , तू घाबरली आहेस. घाबरू नकोस. शांत रहा. मी आलेय ना तुझ्या मदतीला. जरा धीर धर."

आतापर्यंत काठीचा काहीही उपयोग झाला नाही. सयालने हातानेच झुंज द्यायचं ठरवलं.




RAVI

'' अगं तो तुला चावेल !''

'' हा काहीही करू शकत नाही. ह्याचा तर मी जबडाच फाडून टाकेन. '' दात, ओठ खात सयाल म्हणाली.

'' पण माझे पाय मोडलेत गं ह्याने... आई गं !''

'' थोडा धीर धर. ''

सयालच्या निश्चयी चेहऱ्याकडे पाहून निर्मलाने वेदना सहन करण्यासाठी धाडस गोळा केलं. ती सयालच्या छोट्या छोट्या सावळ्या हातांकडे पाहू लागली जे हात अजगराच्या जबडा उघडण्यासाठी जोर लावत होते. सयालने आपले दात ओठांवर घट्ट दाबले होते आणि ती अजगराचा जबडा फाडायचा प्रयत्न करत होती. तिच्या चेहऱ्यावरून घाम निथळत होता. तिच्या हातातून रक्त वाहात होतं. निर्मलाला एक क्षण कळलचं नाही की रक्त पायातून येतयं की तिच्या हातातून आणि आता निर्मलाला मनापासून सयालचं कौतुक वाटलं. अतिसामान्य दिसणारी सयाल किती शर्थीने त्या दैत्याशी लढा देत होती. तिला जणू कसलीच भीती वाटत नव्हती. ती त्या सर्पाला असं काही डिवचत होती जणू तिने त्याला आधीही हरवलं होतं.

अखेर अजगराचा जबडा फाडण्यात सयाल यशस्वी झाली. साप रागाने चरफडू लागला. एक क्षण तर असं वाटलं की, त्या दैत्यापुढे सयाल काही आता तग धरत नाही. आणि तो साप आता दोघींनाही फस्त करेल. पण जबडा उघडताच सयाल ओरडली, '' निर्मला, पाय काढ. झटका दे पायाला, झटका. '' सयाल इकडे ओरडली आणि तिने जबडा पूर्णपणे ताणून धरला.

निर्मलाने तिचा पाय तर सोडवून घेतला पण विळखा अजूनही घट्ट होता. हळूहळू अंग हलवून ती विळख्यातून पाय बाहेर काढायचा प्रयत्न करू लागली. नंतर तिने एक जबरदस्त झटका दिला आणि ती दूर फेकली गेली.

आता तिथे आधीपेक्षाही भयानक युद्ध सुरू होतं. सयाल आणि त्या प्रचंड अजगराचं. तशाही परिस्थितीत सयाल ओरडली, '' निर्मला पळ. निदान, तू तरी स्वत:ला वाचवून पळून जा.'' पण निर्मला असं करू शकली नाही. सयालच्या मदतीसाठी ती तिथेच थांबली. पण तिला कशी मदत करावी, हे तिला सुचत नव्हतं. समोर तो अजगर

सयालला गिळण्यासाठी वारंवार तिच्यावर हल्ला करत होता. आणि सयालही तेवढ्याच धाडसाने तो हल्ला परतवून लावत होती.

अशा धाडसी आणि पराक्रमी सयालचा आपण आजपर्यंत किती द्वेष करीत होतो, ह्याचं निर्मलाला खूप वाईट वाटलं. तिने विचार केला, आज जर ही नसती तर आपण संपलोच असतो. ह्या अजगराने काही आपल्याला जिवंत ठेवलं नसतं. आणि त्याच सयालला वाचविण्यासाठी ती काहीच करू शकत नव्हती. ह्याचं तिला राहून राहून वाईट वाटत होतं.

संपूर्ण ताकद एकवटून, सयाल अजगराचं तोंड पकडून, त्याला मागे ढकलत होती आणि तितक्याच जोराने अजगर तिला आपल्या जबड्यात धरू पाहात होता. तिच्या थरथर कापणाऱ्या हातावरून कळत होतं की, त्याच्याशी झुंजताना तिची किती शक्ती खर्ची पडत होती. साप एकदा मोठ्याने फुत्कारला. त्याने परत एकदा संपूर्ण शक्तीनिशी सयालच्या छातीशी आपलं डोकं आणलं. सयालने त्याचा जबडा पकडला आणि त्याला मागे ढकलू लागली. ती त्याची प्रत्येक हालचाल निरखून पाहात होती. परत एकदा ती ओरडली, '' निर्मला....पळ... दूर हो ह्या दैत्यापासून, निघून जा लवकर. ''

परंतु '' सयाल..सयाल.... '' निर्मला एवढचं म्हणू शकली. तिने पाह्यलं अजगराने सयालला खाली पाडलं होतं आणि तो तिच्या अंगावर बसला होता. एक क्षण सयाल म्हणजे दगडी पुतळाच भासला निर्मलाला.

'' सयाल...सयाल. '' निर्मला घाबरून परत ओरडली. तिला वाटलं सयाल काही आता वाचत नाही.

अजगराचा सयालला गिळण्याचा प्रयत्न आणि सयालचा त्याच्या तावडीतून सुटण्याचा प्रयत्नही तितकाच जबरदस्त. अतिशय भयानक दृश्य होतं ते. थकल्यामुळे सयालचा आवाज खोल गेला होता. तरी ती निर्मलाला ओरडून सांगत होती, '' पळून जा निर्मला, पळून जा. ''

निर्मलाला तिचा आवाज जणू खूप लांबून येतोय असं भासत होतं. आपल्या मैत्रिणीला मृत्यूच्या तोंडात ढकलून पळून जाणे तिला शक्यच नव्हतं. एकाएकी निर्मलाला वाटलं सयालच्या शरीरात एखाद्या दिव्य शक्तीने प्रवेश केलाय. कारण की

सयालने संपूर्ण शक्तीनिशी त्या दैत्याला दूर ढकललं आणि वीजेच्या गतीने ती पळू लागली होती. पळता पळता ती ओरडत होती, " निर्मला, पळ. गुरांना घेऊन पळ. "

आता निर्मलाही जीवाच्या आकांताने पळू लागली. मागे वळून पाहाण्याचीही तिला हिंमत झाली नाही. ती फक्त पळत होती. काही वेळाने सयालही तिच्या मागोमाग आली आणि तिचा हात धरून पळू लागली. जिथे त्यांची गुरं सुखाने चरत होती तिथे येऊन त्या थांबल्या. त्यांना खूप धाप लागली होती. काहीएक न बोलता त्या एकमेकींकडे पाहात उभ्या होत्या. इथे त्यांना कसलीच भीती नव्हती.

अचानक निर्मलाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तिचे ओठ थरथर कापू लागले.

" रडू नकोस. तुला काहीही होणार नाही. तू पूर्ण बरी होशील." सयालने तिला समजावलं.

" ते खरं गं ! पण काय प्रचंड अजगर होता गं तो ! तू नसतीस तर आज काही माझं खरं नव्हतं. नक्कीच त्याने मला मारलं असतं. "

" शी ! असं अभद्र बोलायचं नसतं. सगळं काही व्यवस्थित होईल. "

निर्मलाने सयालकडे असं पाह्यलं जणू काही ती तिला पहिल्यांदाच भेटत होती.

" सयाल ! माझी मोत्यांची माळ तुला द्यावीशी वाटेतय. घेशील ?"

" पण का ? अगं, तुझ्याजागी मी असते तर तूही मला वाचावायला अशीच मदत केली असतीस. "

निर्मलाला खूपच वाईट वाटत होतं. तिला स्वतःची लाज वाटत होती. खाली मान घालून ती म्हणाली,

" मला ते काहीही माहीत नाही. तुला ही माळ घ्यावीच लागेल. तुझ्या प्रेमाची ती सदैव आठवण देत राहील. " थरथरत्या बोटांनी तिने ती माळ काढली आणि सयालच्या गळ्यात घातली.

सयालला निर्मलातला बदल जाणवला. ती एकटक तिच्या डोळ्यात पाहात राहिली. नंतर तिच्या थकलेल्या फिकट चेहऱ्यावर सुखद स्मित पसरलं. आणि ती खूप गदगदून म्हणाली, " घेईन, निर्मला, मी माळ जरूर घेईन."

# २. एका क्षणाची कहाणी

आज गोविंदन् सारखा शाळा सुटायची वाट पाहत होता. त्याला आज शाळेचा कंटाळा आला होता अशातला भाग नव्हता, पण आज त्याला नटराजन्च्या देवळात जायचं होतं.

गोविंदन्, तमिळनाडूमधील कुरूबारपल्ली गावातील हायस्कूलमध्ये आठवीच्या वर्गात होता आणि तो त्या वर्गाचा मॉनिटरही होता. त्याला ती शाळा खूपच आवडत होती आणि त्याच्या इंग्रजीच्या शिक्षिका, शित्रालेहांचा तर तो लाडका विद्यार्थी होता.

गोविंदन्ला फिरायला आणि नवनवीन वस्तूंचा शोध लावायला खूप आवडत असे. अशा या शोधक मुलाला गावातील जुनं नटराज मंदीर म्हणजे मेजवानीच होती. मग तिथे जाण्यासाठी तो किती बरं उत्सुक असेल ? नटराजन् मंदीराचे बांधकाम पल्लववंशी राजांनी केले होते. शाळा सुटल्यानंतर गोविंदन् त्याच्या मित्राबरोबर - रविबरोबर ह्याच देवळात जाणार होता.

"गोविंदन्" श्रीमती शित्रालेहांचा आवाज कानावर पडल्याबरोबर स्वप्ननगरीत हरवलेला गोविंदन् घाबरला आणि उगाचच स्वतःचे केस नीट करू लागला. बाईंची नजर अजून आपल्यावरच खिळलेली आहे हे पाहून खजील होऊन तो म्हणाला, "येस, मॅडम ?"

"ह्या वह्या घे आणि माझ्या घरी देऊन टाक. आता शाळा सुटणारच आहे. तू लगेच नीघ."

गोविंदन्ने त्याचं दप्तर घेतलं आणि वर्गातून निघायच्या आधी त्याने रविकडे पाहिलं आणि त्याला डोळ्यांनीच खुणावलं, "तिथेच भेटू." त्या दोघांचा नेहमीचा अड्डा होता 'जानकीरामन् स्वीट कोकोनट स्टॅन्ड.'



परंतु ३ सप्टेंबर १९७९ ला गोविंदन् आणि रवि आपल्या नेहमीच्या योजनेप्रमाणे भेटू शकले नाहीत.

वह्यांचा गठ्ठा बगलेत मारून गोविंदन् जेव्हा शाळेतून बाहेर पडला, तेव्हा त्याने एकदा समोर पाह्यलं. समोर लांबरुंद रस्ता होता. त्याच्या दुतर्फा हिरवीगार शेतं आणि नारळाची झाडं होती. ह्या दोन्हीतून रस्त्यानं वळण घेतलं होतं. त्याच्या डाव्या हाताला दूरवर गवताने शाकारलेल्या झोपड्या दुपारच्या कडक उन्हात न्हाऊन निघत होत्या. आणि तिथूनच गावाबाहेरील नटराजन्चे मंदीर नारळाच्या झाडीत आणि हिरव्यागार शेतांमध्ये डौलात उभे होते आणि आपल्या अप्रतिम कोरीवकामासाठी प्रसिद्ध होते.

शाळेच्या समोरच, रस्त्याच्या उजव्या बाजूला, एक ट्रक उभा होता. त्यामागून एक माणूस थरथरत्या पावलांनी हळूच पुढे आला. गोविंदन्ने विचार केला, '' कोण बरं असेल हा ? ट्रकचा ड्रायव्हर तर नसेल ? पण हा तर खूपच म्हातारा दिसतोय !'' त्याचा एक हात विचित्र हालत होता आणि तो एकटक आकाशाकडे बघत चालला होता. त्याचे काळेभोर परंतु निर्जीव डोळेही विचित्र वाटत होते. त्याच्या पायात चपलाही नव्हत्या. त्याने एक साधीशी लुंगी गुंडाळली होती. प्रत्येक पाऊल पुढे टाकायच्या आधी तो काठीने रस्त्याचा अंदाज घेत होता. त्याच्या थरथर कापणाऱ्या एका हातात वाडगाही होता. 'हा तर कोणीतरी आंधळा भिकारी दिसतोय !' गोविंदन्ला त्याची खूप दया आली. त्याने आपल्या सदऱ्याचे खिसे चाचपले. पण त्याला एकही नाणं सापडलं नाही.

'ह्या बिचाऱ्याला द्यायला माझ्याकडे काहीही नाही ! बहुधा दप्तरात काहीतरी सापडावं !' गोविंदन्ने असा विचार केला आणि खाली वाकून दप्तरात काही सापडतयं का ते शोधू लागला. इतक्यात त्याला लांबून येणाऱ्या बसचा आवाज ऐकू आला. त्याने मान वर करून पाह्यलं. एक बस प्रचंड वेगाने येत होती.

' असं वाटतंय हा बसचा चालक वळण आल्याशिवाय काही बसचा वेग कमी करणार नाही. आणि पुढे उभ्या असलेल्या ह्या ट्रकमुळे त्या आंधळ्या भिकाऱ्यालाही बघू शकणार नाही. आणि मग.... ?

'' आजोबा, सांभाळून, समोरून बस येतेय.'' गोविंदन् मोठ्याने ओरडला. पण दुसऱ्याच क्षणी त्याला आपली चूक उमगली. '' अरे हा माणूस तर आंधळा आहे, तो बिचारा बसकडे कसा पाहू शकेल. आता त्याला कसं वाचवायचं ?''

भिकाऱ्याने गोविंदन्‌चा आवाज ऐकला खरा, पण तो खूप गोंधळून गेला आणि इकडे तिकडे मान फिरवू लागला. जिकडून गोविंदन्‌चा आवाज आला होता तिकडेही त्याने एकदा मान वळवली. पण त्याला काहीच समजलं नाही आणि तो पुढे चालू लागला.

तिकडे बसही प्रचंड वेगाने पुढे सरकत होती. ' अरे बापरे ! आता काहीतरी करावचं लागेल.' गोविंदन्‌ने त्याचं दप्तर आणि वह्यांचा गठ्ठा तिथेच भिरकावला आणि तो रस्त्याच्या दिशेने पळू लागला. समोरून येणाऱ्या बसचालकाला तो गाडी थांबवण्याचा संकेत करू लागला.

'' थांबा...थांबा पुढे एक भिकारी आहे.'' नंतर त्याने त्या भिकाऱ्याकडे पाह्यलं, जो रस्त्याच्या मध्यभागी असहाय्यतेने उभा होता. त्याचे ओठ हलत होते, पण घाबरल्यामुळे त्याची बोबडी वळली होती.

'' पळा... स्वत:ला वाचवा आजोबा...पळा.''

पण गोविंदन्‌ने विचार केला हा भिकारी पळून जाईल तरी कुठे ? अशा वेळी तर आपणच त्याला रस्ता दाखवायला हवाय. म्हणूनच एका क्षणाचाही विलंब न करता आपण त्याला वाचवायला हवंय.

गोविंदन् खूप वेगाने भिकाऱ्याच्या दिशेने पळू लागला. रस्त्याच्या कडेला पोहोचल्यावर त्याने परत एकदा बसचालकाला थांबण्यासाठी खुणा केल्या आणि मोठ्याने ओरडलाही -

' थांबा, गाडी हळू करा.'

परंतु बसचालकाला त्याचा आवाज ऐकू आला नाही. उलट गोविंदन्‌ला हात हलवताना पाहून त्याने विचार केला, '' एवढ्याश्या चिमुरड्याची हिम्मत बघा. घरी जाण्यासाठी मधेच बस थांबवतोय. पण हा असा विक्षिप्तपणा काय करतोय. धड रस्ताही

ओलांडता येत नाहीय ? अरे बापरे... हा तर रस्त्याच्या मध्यभागी येतोय... काय पण महामूर्ख आहे..?'' ड्रायव्हरने भोंगा वाजवला आणि जोरदार ब्रेक लावला. बस उलटली तर काय गहजब होईल अशी त्याला भीती वाटू लागली.

तिकडे गोविंदन् पापणी लवते न लवते तोच भिकाऱ्याचवळ येऊन पोहोचला. त्याने भिकाऱ्याला आपल्या दोन्ही हातांनी मिठीत घेतलं आणि जोराने उडी मारली. तो एवढ्या वेगात होता की, भिकाऱ्याची काठी आणि वाडगं रस्त्यावर पडले आणि ते दोघेही रस्त्याच्या कडेला धप्पदिशी आपटले. प्रचंड वेगाने जाणारी ती बस काही इंचावरूनच त्यांच्या जवळून गेली.

गोविंदन् आणि तो भिकारी एवढ्या जोराने रस्त्याच्या कडेला असलेल्या खडकाळ जमिनीवर पडले की जणू काही एखादं विमानच धप्पदिशी पडलं असावं. भिकारी गोविंदन्च्या मिठीत असल्याने वाचला. परंतु गुडघ्यांना खूपच मार बसला. त्या एका क्षणात एवढं काही भयानक झालं होतं की, घाबरून गोविंदन्ने डोळेच मिटले होते.

'ची..ची..' असा आवाज करत बस तिथून गेली आणि साधारण वीस यार्डांवर जाऊन थांबली.

'हे देवा ! हे काय चाललयं ?' भिकाऱ्याचा आवाज कानावर पडताच गोविंदन्ने डोळे उघडले. त्याने एका भिकाऱ्याच्या निर्जीव आणि भकास डोळ्यांकडे पाहिले. नंतर एक झटका देऊन त्याने स्वत:ला सावरले आणि घसा खाकरून म्हणाला, '' आजोबा, आपण वाचलो. आता काही काळजी करू नका.''

खोकत खोकत म्हातारा भिकारी म्हणाला, '' मला तर काहीच कळत नाहीय, काय चाललंय ते ! '' माझी काठी कुठाय ? आधी मला ती दे पाहू. तिच्याशिवाय मला चालणं शक्यच नाहीय.''

'' आत्ता आणतो आजोबा, चला उठा.'' गोविंदन्ने असं म्हणून त्या भिकाऱ्याला हात दिला. आणि त्याचा हात धरून चालू लागला. एकाएकी गोविंदन्च्या गुडघ्यातून कळा येऊ लागल्या. त्याचे हात कापू लागले. गालावरूनही रक्त वहात होतं. पण गोविंदन्ने कसलीच पर्वा केली नाही. हातानेच त्याने गालावरील रक्त पुसलं आणि तो त्या भिकाऱ्याची काठी शोधू लागला.

तेव्हा त्याला दिसलं, बसचा चालक संतापत त्याच्याकडेच येत होता. त्याच्या मुठी

वळलेल्या होत्या आणि त्याचे डोळे जणू आग ओकत होते. तो ज्या भाषेत ओरडत येत होता ती भाषा काही गोविंदन्‌च्या पदरी पडत नव्हती.

पण गोविंदन्‌ला हे कळत नव्हतं की, हा बसचालक एवढा नाराज का आहे ? त्याने तर त्या भिकाऱ्याला वाचवायला जे करायला हवं होतं तेच केलं होतं आणि त्यात त्या म्हाताऱ्या माणसाचीही काही चूक नव्हती.

ड्रायव्हर येऊन आपल्यावर तुटून पडेल, ह्या भीतीने गोविंदन् जोरजोरात ओरडू लागला.

'' माझं ऐकून तर घ्या.. ह्यात माझं काहीही चुकलं नाहीय.'' असं म्हणत तो त्या भिकाऱ्याआड जाऊन लपला. ड्रायव्हर त्याचं कशाला ऐकतोय ? तो आत्तापर्यंत गोविंदन्‌जवळ येऊन पोहोचला होता. त्याने गोविंदन्‌चा सदरा धरला आणि त्याला जोरजोरात झिडकारू लागला.

'' अरे ! कृपा करून माझं ऐकून तर घ्या.'' गोविंदन् सारखा त्याला सांगत होता. पण ड्रायव्हरला जर त्याची भाषा समजली असती तर तो त्याचं ऐकलं ? शेवटी गोविंदन्‌ने जोरजोरात ओरडून, खाणाखुणा करून सांगितलं,

'' तो म्हातारा माणूस आंधळा आहे... त्याला दिसत नाही... ह्या ट्रकमुळे तुम्हीही त्याला पाहू शकला नाही.''

ड्रायव्हरने मारण्यासाठी मुठी उगारलेलीच होती. परंतु अजून त्याने मारलं नव्हतं.

अचानक 'पकडा...पकडा, मारा...मारा,' असा जोरजोरात ओरडण्याचा आवाज ऐकू आला. कुरूबारपल्ली हायस्कूलमधील मुलांचा घोळका पळत पळत रस्त्याकडे येत होता.

'' पकडा त्याला... त्याने गोविंदन्‌ला धरून ठेवलयं.''

ड्रायव्हरने मुलांकडे पाह्यलं आणि त्याचं धाबं दणाणलं. परत एकदा मुठी वळत तो काय पुटपुटला कोणास ठाऊक ?

'' गोविंदन्‌ला सोडून द्या. नाहीतर आम्ही तुम्हाला जिवंत सोडणार नाही. गोविंदन् आम्ही येतोय. घाबरू नकोस.'' असं म्हणत ती मुलं तिकडे येत होती.

काही क्षणातच ती मुलं त्या बसचालकावर हिंस्र पशुप्रमाणे तुटून पडली. त्यांनी मारून

त्याचा भुगाच केला असता, पण एका दमदार आवाजाने त्यांना अडवलं. हा आवाज त्यांच्या हेडसरांचा होता.

'' काय चालवलंय तुम्ही ? काय करताय हे ? चला, रस्ता सोडून बाजूला व्हा. ऐकलं की नाही तुम्ही ?''

अनिच्छेने मुलांनी ड्रायव्हरला सोडले. पण तोंडाचा पट्टा अजूनही सुरूच होता. '' भित्रा कुठला ? ह्याला तर तुरूंगाची हवा दाखविलीच पाहिजे.''

हेडसरांनी खुणेने गोविंदन्‌ला आणि बसचालकाला एका बाजूला बोलावले. ह्या वेळेपर्यंत श्रीमती शित्रालेहा पण घटनास्थळी पोहोचल्या होत्या आणि त्यांनी भिकाऱ्यालाही सावरलं होतं.

'' सर ? मी ह्या आंधळ्या भिकाऱ्याला वाचविण्यासाठी जे करायला हवं होतं तेच केलयं. मला कळत नाहीयं हा ड्रायव्हर माझ्यावर एवढा का चिडलाय ते ?''

हेडसरांनी गोविंदन्‌च्या डोक्यावरून प्रेमाने हात फिरवला आणि म्हणाले, '' मी सगळं काही पाह्यलं. तुझ्या धाडसाचं मला विलक्षण कौतुक वाटतंय. एका क्षणाचाही विलंब त्या भिकाऱ्याचे प्राण घेऊन गेला असता. आता जरा मी ड्रायव्हरशी बोलतो.''

असं म्हणून ते ड्रायव्हरकडे वळले. तो त्यांच्या मागेच उभा होता. संतापाने लालबुंद झाला होता.

'' तुम्हाला इंग्रजी येतं का ?''

'' थोडंफार येतं. मी सांगतो. तुमच्या शाळेची मुलं....''

'' एक मिनिट थांबा, आधी मला बोलू द्या. गोविंदन्‌ने एवढ्या झपाट्याने रस्ता का ओलांडला हे मी सांगतो.''

आणि जेव्हा ड्रायव्हरला हेडसरांनी सगळी कहाणी कथन केली तेव्हा लज्जित होऊन तो म्हणाला, '' अरेरे ! हे तर मला माहितच नव्हतं ? खरंच एका क्षणाची तर गोष्ट होती. ही दोघंही बसखाली सापडू शकत होती.''

नंतर तो आपल्या मोडक्या तोडक्या इंग्रजीत गोविंदन्‌ला म्हणाला, '' आय ॲम सॉरी.... आय ॲम सॉरी.''

# ३. मी जळत आहे.

''सोनिया... बाळ सोनिया !''

सोनियाने उत्तरही दिलं नाही की डोळेही उघडले नाहीत. ''काय ? सोनिया तिच्या जीवनाचे अंतिम क्षण तर मोजत नाहीय नं ? पण तिचं हृदय तर.... '' ह्या विचाराने सोनियाची आई भयभीत झाली. ती एकदम ओरडू लागली,

''डॉक्टर, डॉक्टर, माझ्या मुलीला वाचवा हो !''

सोनियाची आई सारखी रडत होती. पाटण्याच्या सरकारी दवाखान्यातील अतिदक्ष विभागात सोनिया झोपली होती. तिचं सगळं शरीर पांढऱ्या पट्ट्यांनी झाकलं होतं. डॉक्टरांनी सोनियाच्या आईला सावरलं आणि तिला घेऊन खिडकीकडे गेले.

''मिसेस सिन्हा, तुम्ही आमच्यावर विश्वास ठेवा. आम्हाला जे करणं शक्य आहे, ते सगळे प्रयत्न आम्ही करतोय.''

''हे का मला समजत नाहीय, डॉक्टर ? पण काय करू ? माझ्यावर तर जणू दु:खांचा डोंगरच कोसळलाय. नुकतंच माझ्या पतीचं निधन झालंय आणि आता .... सोनियाचं काही बरं वाईट झालं तर.... ''

''मी सांगितलं ना ! आम्ही आटोकाट प्रयत्न करतोय. तुम्हाला हेही दिसतंय, तिच्या शरीराचा अधिकांश भाग भाजलाय. आता सगळं तिच्या प्रतिकार शक्तीवर आणि तिच्या जगण्याच्या इच्छेवर अवलंबून आहे.''

''पण डॉक्टर, तिला तर इथे येऊन ३ आठवडे होताहेत.''

''ती चिंता करू नका. संपूर्ण बरं होण्यासाठी तिला ३ आठवडेच काय पण ३ महिनेही राहावं लागेल कदाचित.''

''हे देवा !''

'' तुम्ही खचून जाऊ नका. सोनियासारखी धाडसी मुलगी शोधून सापडणार नाही. तिच्यात जर धाडस नसतं तर तिने जे काही केलंय ते ती कधीच करू शकली नसती.''

सुटीत सोनिया घरी आली होती. तिचा लहान भाऊ सनत नुकताच बोलायला शिकला होता. तिची लहान बहीण शालिनी अंगावर पांघरूण घेऊन झोपली होती. जेव्हा सोनिया तिच्या अंगावरचं पांघरूण नीट करू लागली तेव्हा तिला वाटलं, ' किती दूर राहतो आपण आपल्या बहीण भावांपासून ?'

त्यावेळी सोनिया आजीजवळ पाटण्याला शिकत होती. पाटण्याच्या ' सेंट जोसेफ कॉन्व्हेंट स्कूल ' ची ती विद्यार्थिनी होती. तिला तिची शाळा आणि शाळेतील शिक्षकही खूप आवडत होते. पण तिला नेहमी असं वाटायचं की, आपण इथेच ह्या छोट्याश्या आरा शहरातल्या कुठल्यातरी शाळेत शिकावं. इथे तिचे पप्पा होते. ते सरकारी दवाखान्यात बालरोगतज्ज्ञ होते. इथे तिचे लहान बहिणभाऊ होते.

पण तिच्या वडिलांना नेहमी असं वाटायचं की आपल्या मुलांना एवढं उच्च आणि चांगलं शिक्षण मिळावं की, ज्यामुळे जीवनातील सगळी दालनं त्यांना उघडता येतील.

'' जीवनातील दालनं '' म्हणजे काय हे त्या छोट्या सोनियाला कसं बरं कळावं ? पण तिला हे पक्कं माहीत होतं की, आपले आईवडील आपल्यावर जीवापाड प्रेम करतात. आणि म्हणूनच ती पाटण्याला राहून शिकत होती आणि खूप अभ्यासही करीत होती. ती फक्त सुट्टीतच घरी येत असे. कधी कधी काही विशिष्ट दिवशीही येत असे. जसं ती आत्ता आली होती. ह्यावेळी ती तिचा अकरावा वाढदिवस साजरा करायला आली होती. किती मस्त वाटत होतं तिला त्या दिवशी ? तिचे सगळे जुने मित्र, काका, काकू आणि नात्यातले भाऊ, बहिण आले होते. त्या दिवशी सोनियाने आकाशी रंगाचा फ्रॉक घातला होता. त्याच्या किनारीवर पांढरी झालर खुलून दिसत होती. केसांना पांढरी रिबीन लावली होती. खास वाढदिवसासाठी बनवलेल्या चॉकलेट केकजवळ ती उभी राहिली तेव्हा अकरा मेणबत्यांच्या प्रकाशाने तिचा चेहरा चमकू लागला. कित्ती छान वाटत होतं. आणि सगळ्यात तिला आवडलं होतं ते मम्मी, पप्पा आणि लहान बहीण भावांच्या सान्निध्यात अकरा वर्षाचं होणं !

शालिनीच्या आवाजाने सोनियाला वाढदिवसाच्या सुखद स्वप्नाच्या झूल्यावरून

जमिनीवर आणलं. सोनिया हळूच उठली आणि तिने शालिनीला नीट झोपवलं. अजूनही डायनिंगरूममध्ये तिच्या आई - वडिलांचा आवाज ऐकू येत होता.

'' आनंद, बघ तर, गॅस सिलेंडरचा व्हाल्व तर उघडा नाहीय ? आज तो इतका घट्ट बंद होता की मी उघडूच शकले नाही,'' मिसेस सिन्हा म्हणाल्या.

'' जेवणानंतर नीट करून देतो.''

'' ते आधी नीट कर बाबा ! उन्हाळ्यात स्टोव्हवर स्वयंपाक करायचा म्हणजे अगदी जीवावर येतं.''

अचानक मिसेस सिन्हांना काहीतरी आठवलं त्या म्हणाल्या, '' अरे, मी गॅसवर पाणी उकळायला ठेवलं होतं. विसरलेच बघ !''

सोनियाला खूप झोप येत होती. एकीकडे तिला असंही वाटत होतं की आपण आपल्या आईवडिलांकडे जावं आणि त्यांच्या गप्पात सामील व्हावं. पण तिला हेही माहीत होतं की, एवढा वेळ जागलेलं पप्पांना खचितच आवडणार नाही. म्हणून ती गुपचूप अंथरुणावर जाऊन पडली आणि मग निद्रादेवीने तिच्यावर अशी काही किमया केली की ती एकदम गाढ झोपी गेली.

'' आई ग !''

कुणाच्यातरी किंचळण्याने सोनिया झोपेतून उठून बसली. कोण ओरडलं असावं ? सनत ? शालिनी ? तिने एकदा त्या दोघांकडे पाह्यलं. ती दोघंही गाढ झोपली होती. कदाचित त्यांनी भयानक स्वप्न पाह्यलं असावं. अजूनही तिचं हृदय धडधडत होतं. ती परत झोपणार होती त्याच वेळी तिला तिच्या आईच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला.

'' आनंद, बाहेर ये. व्हॉल्व सोडून दे. गॅसने जोरदार पेट घेतलाय. आनंद तू भाजशील.... आनंद.''

'' नाही माया. ह्याला तर बंद करावंच लागेल.'' सोनियाने वडिलांचा आवाज ऐकला.

'' पण आनंद आग... तू आधी बाहेर ये.''

नंतर आनंद मोठ्याने ओरडला.

'' माया.. पळ.. स्वत:ला आणि मुलांना वाचव. मुलांकडे बघ.. मुलांना ..आई ग.. आग.. आग.''

सोनियाने बिछान्यातून उडी मारली. दुसऱ्याच क्षणी ती '' पप्पा..पप्पा '' ओरडत डायनिंगरूममध्ये आली. तिने पाह्यलं, स्वयंपाक घराजवळ तिची भयभयीत आई तोंडावर बोटं ठेवून उभी होती. काय करावं हे तिला सुचत नव्हतं. तेव्हा तिला स्वयंपाक घराच्या दारावर आगीने झपाटलेले तिचे वडील दिसले. ते कसेतरी बाहेर आले. आणि आईच्या कुशीत पडले. तोपर्यंत सोनिया त्यांच्या मदतीसाठी पुढे आली होती. अचनाक एक आगीचा लोट उठला आणि सोनियाला चाटून गेला. गॅस सिलेंडरने आता संपूर्णपणे पेट घेतला होता. कुठल्याही क्षणी त्याचा स्फोट होऊ शकत होता.

'' धुरामुळे आपण इथे श्वास घेऊ शकत नाही. जीव गुदमरायला लागलाय. आई, चल, आपण पप्पांना घेऊन बाहेर जाऊ या.'' सोनिया पटापट बोलत होती. परंतु तिची आई प्रचंड घाबरलेली होती. ती रडता रडता फक्त एवढच म्हणत होती, '' आनंद...आनंद काय झालं रे तुला ?''

शेवटी सोनियाने स्वतःच तिच्या वडिलांना आधार दिला आणि चालू लागली. तिने एकदा वडिलांकडे पाह्यलं आणि ती प्रचंड घाबरली. खूपच भाजले होते. त्यांचा चेहरा एखाद्या बुडबुड्यासारखा फुगला होता. हे दृश्य पाहून सोनिया फक्त एवढच म्हणू शकली, '' पप्पा हे काय झालं तुम्हाला ?''

'' मम्मी, पप्पांना उचल आणि डायनिंगरूमच्या बाहेर चल.'' सोनिया ओरडली आणि तिच्या पप्पांना खेचून डायनिंगरूमच्या बाहेर नेण्याचा प्रयत्न करू लागली.

सोनियाला आणि तिच्या आईला खूप धाप लागली होती. त्यांचा जीव गुदमरत होता. खोली गरम हवेने भरून गेली होती. आगीची धग आणि गॅसमिश्रित हवा ह्यामुळे डोळ्यांची आग होत होती. त्या दोघी मोठ्या मुश्किलीने आनंदचा निपचित देह कसाबसा मुख्य द्वाराबाहेर काढू शकल्या. मग कसंतरी जिना उतरून लॉनवर आल्या. परंतु आता त्यांना स्वतःला सावरणं अशक्य झालं होतं. त्या दोघीही चक्कर येऊन खाली पडल्या.

'' काय झालं...काय झालं मिसेस सिन्हा ? तुम्ही बोलत का नाही ?'' त्यांची ही अवस्था पाहून त्यांच्या शेजारी राहणारं जोडपं त्यांच्या मदतीला धावून आलं. स्वतःला सावरण्याचा प्रयत्न करीत सोनियाने त्यांच्या सहानुभूतीपूर्ण नजरेकडे पाहिलं.

'' अरे बापरे ? डॉक्टर सिन्हांना हे काय झालं ?''

" गॅस सिलेंडरने पेट घेतला. हे देवा !.. " मिसेस सिन्हांचा कंठ दाटून आला. त्या आपल्या पतीच्या पार्थिव देहावर पडून हमसून हमसून रडू लागल्या.

" अरे विनोद ? लगेच ॲम्ब्युलन्सला फोन करून बोलाव. मी इथेच थांबते." शेजारणीने आपल्या नवऱ्याला सांगितले.

शेजारी लगेच पळाला. त्या शेजारीणबाई मिसेस सिन्हांना जवळ घेऊन धीर देऊ लागल्या.

" घाबरू नका, सगळं काही ठीक होईल."

अचानक सोनियाला आठवलं की शालिनी आणि सनत घरातच आहेत. आग तर वेड्यासारखी पसरतेय, त्यांचं कसं होईल ? हा विचार मनात येताच ती एकदम शहारली. दुसऱ्याच क्षणी ती विजेच्या गतीने उठली आणि " शालिनी, सनत आत आहेत... " असं बडबडत आत पळाली. " थांब सोनिया," शेजारणीने तिला अडवू पाह्यलं. परंतु तोपर्यंत सोनिया घरात पोहोचली होती.

घरातील गरम हवेमुळे तिचा चेहरा लाल झाला होता. तिला वाटत होतं कुणीतरी आपल्यावर जणू गरम लोखंडाच्या कांबीने वार करतय. ती एकदम मागे सरकली. स्वयंपाक घरातील प्रत्येक वस्तूने पेट घेतला होता आणि आगीने भयानक रूप धारण केलं होतं. त्याच क्षणी मोठ्ठा आवाज झाला आणि स्वयंपाक घरातील काचेच्या भांड्यांची शेल्फ खाली पडली. सगळ्या क्रोकरीचा चक्काचूर झाला होता. त्यानंतर जळत्या खिडकीचे एक लाकूड पडले. आग तर वेगाने पसरत होतीच. तेवढ्यात सोनियाने शालिनीचा आवाज ऐकला. ती मदतीसाठी हाक मारत होती. परत एकदा धाडस गोळा करून सोनियाने दार उघडलं आणि दिवाणखान्यातून ड्रॉइंगरूममध्ये आली. गरम हवा आणि धूर ह्यातून तिने कसंतरी इकडे तिकडे पहायचा प्रयत्न केला. चट्चट् आवाज करीत सगळं फर्निचर पेट घेत होतं. दरवाजे जळून गेले होते आणि त्यांचे सांगाडे बिजागऱ्यांच्या आधारावर उभे होते. कपाटांनीही पेट घेतला होता.

त्या आगीच्या ज्वाळांमध्ये सोनिया उभी होती. तिचा चेहरा, हात, पाय सगळीकडून आगीने तिला घेरले होते. तिचे डोळ्यावरचे केसही जळाले होते. ह्यामुळे तिच्या शरीराची हालचालही थांबली होती. ती एकदम खूप घाबरली. तिला एकदा वाटलं बाहेर पळून जावं. पण एक क्षणच. लगेच तिला वाटलं, आपले लहान बहीण भाऊ आत आहेत.

त्यांना वाचवलं नाही, तर ते जळून मरतील. हा विचार मनात येताच सोनिया दचकली आणि तिनं आपलं धाडसी पाऊल उचललं. ती आगीला तुडवत पुढे गेली आणि पापणी लवते न् लवते तोच झोपण्याच्या खोलीत पोहोचली. शालिनी आपल्या लहान भावाला कडेवर घेऊन मदतीसाठी रडत होती. गर्मी आणि घामामुळे ते अगदी हैराण झाले होते. आणि घाबरल्यामुळे त्यांचे चेहरे लालबुंद झाले होते.

'' सोनिया...सोनिया '' म्हणत शालिनीने तिला घट्ट मिठी मारली. सोनियाने तिला सावरलं आणि अचानक तिला असह्य वेदना होऊ लागल्या. तिला शालिनीला धीर द्यावासा वाटत होता. परंतु घशाला कोरड पडल्याने तिचा आवाजच फुटत नव्हता.

सोनियाने जोरजोरात श्वास घ्यायचा प्रयत्न केला. उजव्या हाताने तिने शालिनीला कडेवर घेतलं आणि सनतला छातीशी घट्ट पकडलं. '' सोनिया..मम्मी...पप्पा.. '' छोटासा सनत ओरडू लागला.

'' चूप बेटा..चूप रडू नकोस. घाबरू नकोस.'' सोनियाने त्याला थोपटलं. त्याचवेळी सोनियाचं लक्ष तिच्या हाताकडे गेलं. तिचा हात संपूर्णपणे भाजला होता. परत एकदा तिचं मन कच खाऊ लागलं. भीतीने तिचा थरकाप उडाला. तिला वाटलं., '' आता काही मी बाहेर जात नाही. आम्ही सगळे इथे मरून जाऊ.'' असा विचार मनात येताच तिने स्वतःला समजावलं. ' सोनिया आता हत्ती गेला आणि शेपूट तर राहिलंय ' आणि सोनियाने पुढे पाऊल टाकलं.

तिने जेव्हा पाऊल उचललं, त्या क्षणी तिला वाटलं तिचे पाय जणू लाकडाचे झाले आहेत आणि ते तिचे नाहीतच. भावाच्या आणि बहिणीच्या भाराने तिचे पाय कापू लागले. परंतु लगेच ती सगळा धीर एकवटून खोली बाहेर पडली. बरोबर त्याचक्षणी जळतं कपाट तिच्यामागे पडलं. सोनिया स्वतःला आणि बहिणीला वाचवत तिथून निघायचा प्रयत्न करीत होती. धूर आणि उष्णता ह्यामुळे ती सारखा श्वास रोखून धरत होती. तिला वाटलं कोणत्याही क्षणी आपण गुदमरून जाऊ. पायातही पेटके येत होते. तिला वाटलं, मुख्य द्वारापर्यंत काही आपण पोहोचू शकत नाही.

' जरूर पोहोचशील. घाबरू नकोस.' तिच्या मनाने तिला धीर दिला. परत एकदा जिवाच्या आकांताने तिने पळत जाऊन दार गाठलं. कसंतरी तिनं दार उघडलं आणि ती बाहेर पडली. आता तिच्यात जिना उतरण्याचे ही भान नव्हते. ती पायऱ्यांवरून कलंडली

आणि असह्य वेदनेने ओरडली, '' मम्मी.. मी जळतेय मी जळतेय.. ' आणि ती बेशुद्ध झाली.

'' बेटा बोलू नकोस आता. तू एकदम ठीक आहेस.'' डॉक्टर तिच्याकडे बघून म्हणाले.

'' डॉक्टर माझे मम्मी, पप्पा कुठे आहेत ? शालिनी, सनत कुठे आहेत ?''

'' तुझी आई, तुझी बहीण, तुझा भाऊ ...सगळे ठीक आहेत.''

'' पण मी इथे का आहे ? आणि एवढ्या सगळ्या पट्ट्या ? ह्याच्याने मला त्रास होतोय... आणि माझा चेहरा पण तर... ''

'' बेटा तू आजारी आहेस,'' डॉक्टरांनी तिला समजावलं. ' तुझा चेहरा, गाल, सगळे खूप भाजलेत. परंतु आतून तू तीच आहेस. शूरवीर आणि समजूतदार मुलगी, जिने आपल्या बहीण भावाला आगीच्या तोंडातून बाहेर काढून वाचवलं. आणि जर समजा तुझ्या शरीरावर भाजल्याचे डाग राहिले तरी तुझ्यासारखी शूर मुलगी त्याची पर्वा करणार नाही. काय बरोबर आहे नं ?''

सोनियाने डॉक्टरांकडे पाह्यलं. तिचे डोळे पाण्याने डबडबले.'' नाही.. मी अशा डागांनी कधीही घाबरून जाणार नाही.'' खोल गेलेल्या आवाजात सोनिया म्हणाली.

# ४. मृत्यूचे सावट

शत्रुघ्नचे घारे घारे डोळे अत्यानंदाने चमकू लागले. आनंदाने तो टाळ्या वाजवू लागला आणि नाचू लागला. '' मला नाटकात काम करायला खूप आवडतं. एक दिवस बघा मी '' महाभारत लीला '' मध्ये अर्जुनाची भूमिका करून दाखवीन '' आणि तो छाती ताणून मोठ्याने म्हणाला - '' कृष्णा, जे वीर योद्धे आपल्या शत्रूशी लढण्यासाठी सज्ज आहेत त्या जागी मला घेऊन चल.''

तिथं बसलेल्या बायका, शत्रुघ्नच्या ह्या गोष्टीवर आपल्या पदराआड तोंड लपवून हसत होत्या. मुलं काही चिडवल्याशिवाय गप्प बसणार नाहीत. ती मोठमोठ्याने हसून टाळ्या वाजवत होती आणि मग मुलांनी शत्रुघ्नची नक्कल केली. ती त्याला चिडवू लागलीत - कृष्णा, माझा रथ...

ते सगळे त्या बारा वर्षांच्या अनाथ शत्रुघ्नवर खूप प्रेम करत होते. काही वर्षांपूर्वीच तो आपल्या काकांबरोबर त्या गावात राहायला आला होता. केलाबारी गावातील प्रत्येक माणसाला हा किडकिडीत मुलगा खूप आवडत होता. शत्रुघ्नही सगळ्यांना मदत करायला आणि हसवायला नेहमी तत्पर असायचा.

तिथे बसलेल्या बायकांमध्ये चितनदेवी सगळ्यात मोठी होती. त्या आपलं हसू थांबवून म्हणाल्या '' बरंय शत्रुघ्न, आम्ही तुला आमच्याबरोबर घेऊन जाऊ. संध्याकाळ झाली की आपण निघूया.''

हे ऐकून शत्रुघ्न आनंदाने उड्या मारू लागला आणि लगेच आपल्या काकाच्या घराकडे पळाला. घरी आल्यावर त्याने पटपट आंघोळ केली आणि स्वच्छ कपडे घातले. आपलं पितळेचं ताट घेऊन धुराने भरलेल्या स्वयंपाकघरात जाऊन बसला. काकूने

पटकन त्याचं ताट वाढलं. शत्रुघ्नने एवढं बकाबका खाल्लं जणू काही तो महिनोंमहिने उपाशी होता.

" हळू हळू खा बेटा " काकू म्हणाली. पण तो कसला हळू खातोय ? आणि भरीत भर म्हणजे आज त्याचं अत्यंत आवडतं जेवणं होतं.. वाटाणे आणि भात. जेव्हा त्याचं पोट टम्म भरलं तेव्हा ओठांवरून जीभ फिरवत आणि बोटं चाटत तो काकूला म्हणाला - " काकू आज स्वयंपाक एकदम छान झालाय. मला वाटतं मी जरा जास्तच जेवलोय."

" हे तर तू दररोज सांगतोस आणि खातोस बाकी एवढसं." काकू हसत म्हणाल्या.

" परंतु आज मला जेवायलाच हवं होतं भरपूर. कारण की आज मी भाटागावात महाभारत लीला बघायला जाणार आहे. चितनदेवी मला घेऊन जाताहेत. उद्या सकाळपर्यंत आम्ही परत येऊ."

" बरं जातोयस खरा. पण जरा सांभाळून जा आणि हे बघ, दंगा, मस्ती करू नकोस." काकूंनी सूचना दिल्या.

" बिलकूल नाही... " नेहमीप्रमाणे त्याने काकूला आश्वासन दिलं आणि घराबाहेर पडला. काकू कौतुकाने हसत त्याच्याकडे पाहू लागल्या.

ती वेळ सूर्यास्ताची होती. चार बायका आणि सहा मुलं असा एक तांडा चालला होता. हळूहळू ते एका किर्रर जंगलात जाऊन पोहोचले. रात्र होत आली होती. नोव्हेंबर महिना होता आणि थंडीला सुरुवात झाली होती. थंड वारा नाकाकानाशी झोंबत होता.

चितनदेवी म्हणाल्या, " आता थंडीला सुरुवात झालीच समजा." बरोबरच्या बायकांनी माना हलवून त्यांच्या सुरात सूर मिसळला. मग त्यांनी आपापल्या पदरांनी स्वत:ला व्यवस्थित गुंडाळून घेतलं. तेव्हा शत्रुघ्न छोट्या निर्मलचा हात धरून शीळ घालत चालला होता.

" असं करू या, आपण रूळांवरून चालू या," चितनदेवी म्हणाल्या आणि ते सगळे भिलाई - राजगड रेल्वेमार्गावरून चालू लागले. चितनदेवी म्हणाल्या, " आता फुलझाड नाला ओलांडायला आपल्याला काहीही त्रास होणार नाही."

" पण चितनकाकू, रेल्वेरुळावरून चालणं योग्य आहे का ?" शत्रुघ्नने विचारलं, " रस्त्यावरून जाणं तर नक्कीच चांगलं आहे पण ह्या वेळी कुठलीही गाडी जात नाही.

चला, उशीर करू नका.'' चितनदेवी म्हणाल्या. शत्रुघ्नने, बायकांना आणि मुलांना उंच रेल्वेलाईनवर जाण्यासाठी मदत केली. अजूनही तो निर्मलचा हात धरून सर्वांच्यापुढे चालत होता. रात्रीची वेळ होती आणि सगळीकडे इतका अंधार होती की, ते एकमेकांना पाहूही शकत नव्हते. फक्त प्रत्येकाच्या अस्तित्वाची जाणीव होत होती. लवकरच त्यांना रुळांच्या पट्ट्यांवरून चालण्याचा सराव झाला आणि म्हणूनच ते लवकर लवकर चालू लागले.

'' आई, जरा हळू चाल गं ! मी इतक्या भरभर नाही पळू शकत.'' शत्रुघ्नने मागून एका लहान मुलाचा आवाज ऐकला. तिकडे चितनदेवीच्या कडेवरील बबलीने रडायला सुरुवात केली. '' गप..गप बेटा रडू नकोस.'' चितनदेवींनी तिला समजावलं. '' बस आता आलंच गाव. तुला शकुंतलेची गोष्ट सांगू का ?''

'' अग चितनकाकू.... ती गोष्ट नको. ती तर शंभर वेळा ऐकलीय.'' शत्रुघ्न म्हणाला.

'' काही हरकत नाही.'' चितनदेवी म्हणाल्या. '' आता सगळ्यांनी शकुंतलेची गोष्ट ऐकायची हं ! ज्यांनी शंभरवेळा ऐकलीय त्यांनी पण आणि ज्यांनी एकदा ऐकलीय त्यांनी पण.'' आणि त्या गोष्ट सांगू लागल्या.

शत्रुघ्नला ह्या गोष्टीचा कंटाळा आला होता. त्याने आळस घेतला आणि तोंड वेडवाकडं करू लागला. पण जेव्हा चितनदेवी राजा दुष्यंत आणि शकुंतलेच्या सुखदु:खाचे वर्णन करू लागल्या, तेव्हा शत्रुघ्नला कळतच नव्हतं तो कुठे चाललाय आणि कुठे आहे ते. एवढा तो गोष्ट ऐकण्यात दंग झाला होता. तेव्हा फक्त चितनदेवी बोलत होत्या आणि बाकी सगळे ऐकत होते. अचानक शत्रुघ्न थांबला. त्याला अंधारात काहीतरी चमकल्यासारखं वाटलं. त्याने अंधारात नीट पाहायचा प्रयत्न केला. आणि मागे वळून म्हणाला, '' बघा तर, आगगाडी तर येत नाहीय नं ?''

'' गाडी - गाडी !'' घाबरून मुलं ओरडायला लागलीत. '' अरे काय वेड्यासारखं बडबडतोयस ? ह्यावेळी कुठलीही गाडी जात नाही आणि जाणारही नाही.'' चितनदेवी चिडून म्हणाल्या, '' शत्रुघ्न, तू जरा गप्प बस बघू. उगाच मुलांना घाबरवू नकोस. आणि मला मध्ये अडवू नकोस. हं...तर मी काय सांगत होते ? अरे हं... शकुंतला रडू लागली... ''

वैतागून शत्रुघ्नने मान हलविली आणि गप्प बसला. त्याने विचार केला, कदाचित चितनदेवीचं बरोबर असावं. त्यानेही रात्री आठ वाजता ह्या रेल्वेमार्गावरून गाडीचा आवाज कधीही ऐकला नव्हता.

लवकरच ते नाल्यावरून जाणाऱ्या रेल्वे पुलावर पोहोचले. अचानक हवेचा एक झोत आला आणि पुलावरून सूं.. सूं आवाज करीत निघून गेला. हवेच्या त्या झोतामुळे त्यांचे केस उडू लागले, चेहरा आणि हाताची बोटं गारठू लागलीत. सगळे एकमेकांच्या जवळ सरकले, चितनदेवी काहीतरी ओरडल्या. परंतु वाऱ्याच्या झोतात त्यांचा आवाज विरून गेला. छोटीशी निर्मला थरथर कापू लागली आणि तिने शत्रुघ्नचा हात घट्ट धरला.

'' लवकर...लवकर '' त्यावेळी चितनदेवींनी सगळ्यांना आदेश दिला. आणि प्रत्येकजण भरभर चालण्याचा प्रयत्न करू लागला. शत्रुघ्न सगळ्यांच्या पुढे होता आणि मागे ते सगळे एकमेकांना धक्का देत होते. ते पुलाच्या मध्यापर्यंत पोहोचले असतील आणि परत वादळाच्या जबरदस्त तडाख्याने पूल हलू लागला.

'' पूल हलतोय '' एक स्त्री ओरडली आणि तेव्हाच एक लहान मुलगीही ओरडली, '' आई पूल तुटतोय.''

'' काय बावळटासारखं बडबडतेस.'' चितनदेवींनी तिला दटावलं. '' वारा जोरात आहे म्हणून असं वाटतंय. चला, भरभर चला.'' तेव्हा शत्रुघ्नला वाटलं हा आवाज वाऱ्याचा नसून आगगाडीचा आहे. परंतु आगगाडी कुठल्या दिशेने येतेय आणि किती लांब आहे ह्याचा अंदाज लावणं कठीण होतं. त्याने परत एकदा अंधारात डोळे फाडून पाहिलं, पण त्याला काहीही समजू शकलं नाही. परत एकदा वादळी वारा जोरात आला, आणि त्याचा चेहरा धुळीने झाकला गेला.

शत्रुघ्नने लगेच स्वत:ला सावरलं. त्याची खात्री पटली की आगगाडी येतेय. अंधाराला चिरत गाडी पुढे येत होती. खरं म्हणजे गाडीच्या आवाजामुळेच पूल हलतोय असा भास होत होता. '' गाडी.. गाडी.. निर्मल, चितनदेवी... पळा सगळे.. पळा '' तो ओरडला.

पण पळायला वेळच कुठे होता ? शत्रुघ्नला वाटलं गाडीचं इंजिन त्याच्यापासून पन्नास हाताच्या अंतरावरही नाहीय. आतातर सगळे मरणार. आणि सगळ्यात वाईट गोष्ट ही होती की, शत्रुघ्नला अजूनही इंजिन कुठे आहे हे दिसत नव्हते. खरं म्हणजे त्या दिवशी

त्या इंजिनचा दिवा खराब झाला होता. ''पळा... पळा... सगळ्यांनी उड्या मारा.'' निर्मलचा हात पकडून शत्रुघ्न रुळापासून दूर सरकला आणि पुलाच्या कठड्याला घट्ट धरून उभा राहिला. त्याने आपला चेहरा मागे वळवला, आणि अंधारात जाणाऱ्या त्या राक्षसी इंजिनच्या काळ्या सावलीला बघून भितीने थरथर कापू लागला. इंजिन सूं... सूं आवाज करीत धडधडत निघून गेलं.

एक क्षण त्याला असं वाटलं इंजिनच्या आवाजात त्याने चितनदेवीचा आवाज ऐकला, पण नंतर त्याला काहीही कळलं नाही. '' हे देवा रक्षण कर.'' वेगाने जाणाऱ्या इंजिनच्या हादऱ्यांमुळे शत्रुघ्नचे पाय सरकले होते आणि तो कठड्याला लोंबकळत होता. त्याने एका हाताने भीतीने कापणाऱ्या निर्मलचा हात घट्ट धरून ठेवला होता.

राक्षसी इंजिन जसं आलं होतं तसंच अंधारात दिसेनासं झालं. आता सगळीकडे शांतता होती. कुठेही कसलाही आवाज नव्हता आणि तेवढ्यात निर्मला ओरडली... '' आई..आई.. ई.ई.ई...'' पण तिला उत्तर मिळालं नाही.

शत्रुघ्नला वाटलं चितनदेवी आता येतील आणि इंजिनड्रायव्हरवर तुटून पडतील. परंतु त्या किर्रर शांततेत एक शब्दही ऐकू येत नव्हता. सगळीकडे त्या भयानक रात्रीची भयानक शांतता पसरली होती. जणू काही काळच थांबला होता.

'' चितनदेवी...बबली..सुक्कूबाई... !''

शत्रुघ्नने एकेकाला हाक मारली. पण त्याला उत्तर मिळालं नाही. भीतीने त्याचा थरकाप झाला. काय झालयं ह्या सगळ्यांना ? कुठे गेलेत हे सगळे ?

तेव्हा त्याला कुणाच्यातरी कण्हण्याचा आवाज ऐकू आला. नंतर तो आवाज ओरडण्याचा वाटू लागला. आणि नंतर असह्य वेदनेने कुणाचा तरी आक्रोश त्याला ऐकू येऊ लागला.

अरे हा तर बबलीचा आवाज आहे. अंधारात शत्रुघ्न ओरडला, '' बबली तू कुठं आहेस ?'' इकडे निर्मल रडू लागली की मला घरी घेऊन चल.

''होय.. होय जरूर घेऊन जाईन '' स्वत:ला सावरत शत्रुघ्नने तिला समजावलं, '' जरा थांब, बघू तर खरं काय झालंय ते ?''

शत्रुघ्नने निर्मलला कडेवर उचललं आणि रेल्वेरुळांमध्ये येऊन उभा राहिला. डोळे

फाडफाडून तो अंधारातून पुढे सरकत होता आणि बबलीला शोधत होता. '' बबली... ए बबली.. '' त्याने प्रेमाने हाक मारली.

'' अरे देवा, हे काय ? शत्रुघ्न मोठ्याने ओरडला. खरं म्हणजे त्याच्या पायाचा धक्का लागून काहीतरी घरंगळलं होतं. त्याचे पाय एकदम बांधले गेल्यासारखे झालेत. तरी त्याने धीर सोडला नाही. शेवटी त्याला सगळ्यांना शोधायचंच होतं. खाली वाकून त्या रेल्वेच्या पट्ट्यांवर हातावर अंदाज घेऊन त्यांना शोधू लागला. तेव्हा त्याच्या पायाला लहान मुलाच्या शरीराचा स्पर्श झाला. त्याने पटकन् सावधानतेने त्याला उचललं आणि कडेवर घेऊन त्याला चुचकारू लागला. ही बबलीच होती. तिच्या पाठीवरून हात फिरवत असताना त्याला जाणवलं की तिच्या पाठीवर जखम आहे.

त्याला खूप थकल्यासारखं वाटलं, पण त्याने धीर सोडला नाही. त्याला हे माहीत होतं की, आता एका क्षणाचाही विलंब न करता इथून जायला हवंय आणि कुणाला तरी मदतीला बोलवायला हवंय. परंतु तो तसं करू शकला नाही. '' चितनदेवी... '' परत एकदा त्याने अंधारात हाक मारली. '' चितनदेवी.. सुक्कूबाई '' त्याचा आवाज अंधारात विरून गेला. कुठूनही कसलाच आवाज आला नाही. '' निर्मल चल, माझा हात पकड. '' त्याला हे माहीत होतं की मदतीसाठी कुणीतरी येईल. तोपर्यंत खूप उशीर झालेला असेल तरीही तो निघाला.

अंधारात भरभर चालून त्याला जवळच्याच मुंगरी गावात पोहोचायचं होतं. म्हणून तो रस्ता शोधण्यासाठी रेल्वे लाईन सोडून चालू लागला. एका हाताने त्याने जखमी बबलीला कडेवर घेतलं होतं आणि दुसऱ्या हाताने निर्मलला पकडून तो चालला होता. रस्ता खडबडीत होता त्यामुळे त्याच्या पायाला सारखं लागत होतं. एकाएकी तो धडपडून खाली पडला. निर्मल पण पडली. लगेच तो उठला आणि स्वत:ला सावरत निर्मलला समजावू लगला, '' काही झालं नाही.. घाबरू नकोस... सगळं ठीक होईल. ''

रात्र वाढत होती. घुबडाचा भयानक आवाज ऐकून त्याचा थरकाप झाला. रात्र एवढी काळोखी आणि भयानक असते ह्याचा त्याने कधी स्वप्नातही विचार केला नव्हता. अचानक एक पक्षी त्याच्या पायांना आपल्या मऊ पंखांनी मारून उडून गेला. आधी तो घाबरला, नंतर स्वत:ला सावरून मनात म्हणाला ' बहुतेक वटवाघूळ असावं. ' गवतात सळसळ झाली. थांबून त्याने नीट ऐकलं. जंगलांत काही ठिकाणी गिधाडांचा

हुआ - हुआ आवाज येतहोता. तर काही ठिकाणी सुतारपक्ष्याचा खो: खो:

शत्रुघ्नला प्रत्येक पावलागणीक धोका दिसत होता. विषारी सर्प, जंगली कुत्रे, रानरेडे, सिंह....सगळेच तर होते इथे. दुसऱ्याच क्षणी त्याने आपल्या भयानक विचारांना झटकलं आणि आपली सगळी ताकद एकवटून प्रत्येक संकटाला तोंड देत पुढे जाऊ लागला. कसंही करून त्याला मुंगरी गावापर्यंत पोहोचायचं होतं आणि तो मुंगरीला पोहोचला तेव्हा इतका थकला होता की, त्याचे पाय कापत हाते. गावात शिरताच जी पहिली झोपडी दिसली तिचं दार वाजवलं आणि ओरडू लागला.. ''वाचवा..वाचवा ! ह्या मुलीला वाचवा, ती मरतेय,'' आणि काही मिनिटातच सगळा गाव गोळा झाला. ''काय झालं रे ? काय झालं ? अरे हा तर रक्तबंबाळ झालाय. काही लागलंय का ?'' लोकं विचारू लागली. ''मला नाही, ह्या मुलीला लागलंय. हिला वाचवा. आम्ही दहाजणं होतो. आत फक्त तीनच उरलोय. मला माहीत नाही बाकीच्यांचं काय झालं ते. कदाचित ते सगळे...'' असं म्हणत असतानाच शत्रुघ्न चक्कर येऊन खाली पडला. गावप्रमुखाने कसंतरी त्याला सांभाळलं.



मुंगरी गावची माणसं आता मध्यप्रदेशामधील राजगडकडे जाणाऱ्या रेल्वेमार्गावरून गुपचूप चालत होती. त्या मुलाच्या अर्धवट कहाणीने ते खूपच घाबरले होते.

शेवटी फूलझाड पुलावर पोहोचल्यावर त्यांनी प्रकाश केला आणि समोरचं दृश्य पाहून त्यांच्या अंगावर काटे उभे राहिले. गाडीच्या दोन रुळांमध्ये सात माणसांच्या प्रेतांचा खच पडला होता. ते दृश्य परत पाहाण्याचं धाडस काही त्यांच्याकडून झालं नाही.

'' शेवटी हे सगळं झालं कसं काय, बाळा ? गाडीचा भोंगा तुम्ही ऐकला नाही ?''

'' ड्रायव्हरने शिटीही वाजवली नाही आणि इंजिनचा दिवाही जळत नव्हता.'' शत्रुघ्नने सांगितलं.

'' एक फक्त इंजिन आणि तेही विना दिव्याचं !'' एक माणूस म्हणाला, '' खरंच ! छोट्याश्या चुकीपायी केवढी मोठी दुर्घटना होऊ शकते.'' कदाचित ते इंजिन एका स्टेशनवरून दुसऱ्या स्टेशनवर जात असावं. परंतु ह्या लोकांचा तर ते काळच ठरलं.'' कुणीतरी म्हणालं.

'' पण बाळा, तुम्हाला इंजिनचा आवाजही ऐकू आला नाही ?''

'' हो, मी ऐकला होता. पण तोपर्यंत खूपच उशीर झाला होता. बाकीच्यांनी त्याचा आवाज ऐकला नसावा किंवा ऐकूनही पळू शकले नाहीत.'' शत्रुघ्न दु:खातिरेकाने रडू लागला.

'' रडू नकोस बाळा, ह्यात तुझं काहीच चुकलं नाहीय. ह्या दोन मुलांचे प्राण वाचवून तू खूप धाडसाचं काम केलं आहेस. जर ह्या काळोख्या रात्रीत तू धाडस करून गावात आला नसतास तर विचार कर काय झालं असतं ?''

गाव प्रमुखाने सांगितलं, '' बहादुरलाल ह्या लोकांना घरी घेऊन जा. जा बेटा. जा. देव तुझं रक्षण करेल.''

शत्रुघ्न बहादुरलालबरोबर गुपचूप चालू लागला. त्याला अजूनही असंच वाटत होतं की, त्या भयानक शांततेत मृत्यू त्याच्याबरोबरच चालतोय.

# ५. हे महिमामयी माते, माझं रक्षण कर

शनिवार, २२ फेब्रुवारी, १९६५. हा दिवस मी कधी विसरणार नाही. कधीही नाही. आजसुद्धा जवळजवळ १५ वर्षानंतरही, माझ्या कानांना मृत्यूच्या तोंडात जाणाऱ्या मुलांचा भयानक आक्रोश, असहाय्य मुलांच्या दुःखद हाका आणि मुलांच्या तोंडून निघणारे - 'मेरी, हे महिमामयी माते ! आमच्यावर दया कर.' - प्रार्थनेचे हे शब्द ओरबाडून घेणाऱ्या रौद्र वाऱ्याचा आवाज स्वच्छ ऐकू येतोय.

मी माझ्या आईचे ते भयभीत डोळे कधीही विसरणार नाही. जेव्हा ती मला आपल्या कुशीत घेऊन म्हणाली, ''फेलिटॉस, माझ्या बाळा ! ईश्वर खूप दयाळू आहे, त्याने माझी मुलगी मला परत दिली. हे देवा, तू खूप महान् आहेस, तू माझी प्रार्थना ऐकलीस.''

मग मीही तेच केलं, जे त्या कष्टदायी काळात मी करू इच्छित होते. मी तिच्या कुशीत शिरून रडू लागले. ओरिसातील झुनमीर गावात ही प्रथा होती की, जी व्यक्ती मृत्यूच्या जबड्यातून परत येते तिचे पाय तेलाने धुतात. माझ्या आईनेही तेच केलं.

''फेलिसिटॉस, तू जा.'' आईने माझ्या कपाळाचं चुंबन घेतलं आणि म्हणाली, 'बेटा, मी पण तिथे आले असते. पण तुला तर माहीतच आहे लहान मुलांना एकटं कसं सोडू घरात ? तुझ्या वडिलांना शेतावरही मदत करायला जायचंय. म्हणून तूच जा. देव तुझं रक्षण करील.''

''ठीक आहे, आई.'' असं म्हणून मी चालू लागले. तेव्हा मलाही असं वाटलं होतं की, पाच मैल दूर नदीकाठावरील कसरेल गावी आईनेसुद्धा आपल्याबरोबर यावं. पण आता वाटतं न येऊन तिनं चांगलं केलं.

''ए फेलिसी !'' मी एक परिचित आवाज ऐकला. ''तुम्ही सगळे एवढे नटूनथटून

कुठे चाललात ?'' मला कळलं हा आवाज फिलोमिनाचाच आहे आणि म्हणूनच ऐकलं न ऐकल्यासारखं केलं. पण माझ्या सर्वात आवडत्या मैत्रिणीची उपेक्षा करणं कठीणच नाही तर अशक्यही होतं. ''फेलिसी !'' ती परत ओरडली आणि पळत येऊन तिने मला मिठी मारली. ''ह्या नारिंगी साडीत आणि ब्लाऊजमध्ये तू खरंच खूप गोड दिसतेस. अरे, कानातले नवीन वाटतं ? चांदीचे आहेत ?'' आणि मग कानातले हातांनी हलवत हसू लागली. खोटं खोटं रागवून मी तिचा हात झटकला. ''फिलो, आता तू छोटीशी नाहीस.. चांगली सोळा वर्षांची झालीस. जरा नीट राहत जा.'' आणि दुसऱ्याच क्षणी आम्ही ओरडू लागलो, ''अरे होडी आली. पळा, पळा, सुटेल नाही तर !''

आम्ही दोघीही स्वतःच्या साड्या सावरत काठाकडे पळालो. पळण्यामुळे आमचे केस उडत होते. काचेच्या बांगड्याही किणकिणू लागल्या. होडी आता सुटणारच होती, तेवढ्यात आम्ही उड्या मारून बसलो. काठावरील लोकांचा हात हलवून आम्ही निरोप घेत होतो - 'सोमवारी परत भेटू.' आणि ती माणसं दिसेनाशी होईस्तोवर हात हलवून आम्ही त्यांचा निरोप घेत होतो. आता आमची होडी कसरेल गावाकडे चालली होती. तिथे आम्ही देवी मेरीच्या जत्रेत सहभागी होण्यासाठी चाललो होतो.

नदीच्या हिरव्या पाण्यावर होडी मजेत चालली होती. तिकडे अस्ताला जाणाऱ्या सूर्यामुळे क्षितिजावर लाली पसरली होती. नदीच्या दोन्ही काठांवर नारळाची झाडं आणि शेतातली धान्यांची कणसं मस्तीत झोके घेत होती. त्या होडीत पुरुष, बायका आणि मुलं मिळून आम्ही ९० लोकं होतो. सगळे हात जोडून भजनं म्हणण्यात दंग होते. मी आणि फिलोपण त्यांच्याबरोबर गात होतो. हळूहळू रात्र होऊ लागली. नदीकाठची झाडंही अंधारात बुडू लागली. पण खरंच रात्र होत होती का ? मी ह्या प्रश्नाच्या उत्तराच्या अपेक्षेने म्हाताऱ्या नावाड्याकडे पाह्यलं. तो ह्यावेळी अतिशय गंभीर होऊन आकाशाचे निरीक्षण करीत होता. अचानक थंड हवेचा एक झोत आला आणि पाण्यात तरंग उडवून गेला. होडी हलू लागली. आणि मुलं घाबरून ओरडू लागली.

''घाबरू नका. काहीही होणार नाही... शांत रहा.'' एक नावाडी ओरडला. परंतु जंगलातल्या उंच - उंच झाडांमागून काळे ढग आकाशात हळू हळू जमत असलेले पाहून, नावाड्याच्या गोष्टींवर विश्वास ठेवणं कठीण होतं. नदीचं रूपही बदलू लागलं होतं.

पाण्याच्या लाटा होडीवर सारख्या आपटू लागल्या आणि त्यामुळे होडी जोरजोरात हलू लागली. मुलं आपल्या आईच्या कुशीत लपली आणि माणसं हैराण होऊन दूर काठाकडे पाहात होती. तेव्हा आमची होडी नदीच्या मध्यभागी होती.

फिलोमिनाकडे भयभीत होऊन मी पाह्यलं. ''मला पोहता येत नाही.'' ती कुजबुजली. तिचा चेहरा फिका पडला होता. मला तर पोहता येत होतं, पण होडीत अशी किती तरी माणसं होती, ज्यांना पोहोता येत नव्हतं. अनाकलनीय संकटाच्या चाहुलीने माझं मन चरकलं आणि आम्ही सगळे देवाची प्रार्थना करू लागलो - 'हे परमपिता, परमेश्वरा... ' परंतु आमच्या प्रार्थनेचे स्वर आकाशात वेगाने जमणाऱ्या काळ्या ढगात आणि वाऱ्यांच्या तीव्र झोतात विरून गेले. ''अजून वेगाने वल्हव बेटा, अजून वेगाने..'' म्हाताऱ्या नावाड्याने होडी चालवणाऱ्या आपल्या मुलाला सांगितलं, 'जोराचं वादळ उठतंय... कसंही करून वादळात सापडण्याआधी काठावर पोहोचायला हवयं.''

तरुण नावाडी वैतागले ग आणि थकलेला वाटत होता. तो आपल्या पूर्ण शक्तीनिशी वल्हवत होता.

अचानक होडीत पाणी शिरलं.

''हे आई मेरी.. हे देवी माते.. आमचं रक्षण कर. '' अचानक पाण्याची एक लाट आली आणि नदीतले पाणी उसळ्या मारू लागले. '' हे मेरी माते.. हे येशूच्या आई... आम्हा सगळ्यांची आई... '' प्रार्थनेचे स्वर घुमू लागले.

'' वल्हवत रहा.. वल्हवत रहा.'' नावाडी ओरडला.

आम्ही सगळे एकमेकांना धरून देवाला आळवत होतो. शेवटी भयानक वादळ आलंच. पाण्याने जोरात उसळी मारली आणि आमची होडी भोवऱ्यात अडकल्यासारखी असहाय्यपणे खालीवर होऊ लागली. अचानक वाऱ्याचा एक झोत एवढ्या वेगाने आला की, आम्ही सगळे स्वत:च्या जागेवरून होडीच्या दुसऱ्या भागात जाऊन पडलो. आम्ही सगळे ओरडत होतो. आमच्या खाली गुडघ्याला थोडसं लागलं. '' फेलिसी...फेलिसी '' फिलोचा आवाज ऐकून मी हात पुढे केला. पण ती माझा हात धरू शकली नाही. होडी जोरजोरात हलत होती आणि आम्हांला असं वाटत होतं की, ह्या उसळणाऱ्या नदीच्या पाण्यात आम्ही कुठल्याही क्षणी पडू शकत होतो. अचानक

एका लाटेने मला आपल्या कवेत घेतलं. आणि मला खाली पाडलं. मी स्वत:ला सावरण्याचा खूप प्रयत्न केला आणि हातपाय हलवू लागले. तेव्हा कुणीतरी मला वाचवण्यासाठी हात दिला होता; तोही सुटला आणि मग मग....ती फिलो होती.

धापा टाकत मी पाण्याबाहेर आले. पुरुष, बायका, मुलं मदतीसाठी आक्रोश करत होते.. ते होडीच्या काठांना पकडून आधार घेत होते, पण स्वत:ला सावरण्याच्या अयशस्वी प्रयत्नात तो आधारही सुटून जात होता. ते पडत होते, एकमेकांना ढकलत होते आणि निराशेने, घाबरून इकडेतिकडे पहात होते. शेवटी एक लाट एवढी मोठी आली की तिने संपूर्ण होडी उलटवून टाकली.

'काय, मी ह्यातल्या कुणालाही मदत करू शकत नाही ? मी का ह्यांना असंच बुडून मरताना पहात राहाणार आहे.' मी पाह्यलं एका झाडाची फांदी तीस फुटांवर होती. तिच्या आधाराने मी बचावाचा काही उपाय करू शकत होते. आणि म्हणूनच वेगाने वाहाणाऱ्या वाऱ्याचा त्रास होऊ नये म्हणून डोळे बंद करून मी तिकडे जाऊ लागले.

''फेलिसिटॉस,... फेलिसिटॉस,...'' लोकं ओरडू लागले. मी त्या फांदीवर बसले आणि त्या खालून वाहत जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला आधार देऊन वर खेचू लागले.

'या...या' मारकस ओरडू लागला. रेमंड, डेविड, मारकस आणि मेरी - सगळ्यांना थंडीने हुडहुडी भरली होती. मला खूपच धाप लागली होती. एकदा तर पडतच होते, पण त्यांनी मला सांभाळलं. ते सगळे जिवंत होते. पण बाकीच्यांचं काय झालं होतं, आणि माझी मैत्रिण फिलो ?

''मला तिला शोधायचं आहे. तिला मदत करून वाचवायला हवंय.''

''नाही फिलोसिटॉस, नाही आता आपण काहीच करू शकत नाही. वादळ संपेस्तवर थांब.'' ती लोकं म्हणाली.

मी कापत होते. माझ्या गालांवरून पाणी वाहात होतं - किंवा ते मैत्रिणीच्या ताटातुटीमुळे निघालेले अश्रू असावेत.

''अरे बघा.. कुणी बोलावतंय,'' मेरी म्हणाली. आम्ही नीट ऐकलं. एक खोल गेलेला आवाज होता - 'वाचवा... वाचवा.' ''अरे, हा सॅम्युअल डुंगडुंग तर नाही ?'

''तो बुडतोय.'' मेरी ओरडली, ''त्याला पोहोता येत नाही. हे देवा, तो तर बुडाला.''

आणि मग वाऱ्याचा सूं..सूं आवाज आणि पाण्याचा आवाज. ह्या व्यतिरिक्त काहीही ऐकू येत नव्हतं. मी मेरीकडे पाह्यलं, ती खूपच घाबरली होती. आणि तिचे डोळे पांढरेफटक पडले होते. डेव्हिड, रेमंड, मारकस - सगळ्यांची तीच परिस्थिती होती. मदतीसाठी कुणीही हलत नव्हता.

'वाचवा' सॅम्युअल परत ओरडला. तो आमच्या डोळ्यांसमोर बुडत होता. हो... आमचा भाऊ सॅम्युअल डुंगडुंग बुडत होता.

अचानक एका विचित्र शांततेने माझं मन घेरलं. मी स्वत:ची साडी सोडली आणि गुंडाळी करून परकरात खोवली. आता मी ओरडून म्हणाले, ''सॅम्युअल...सॅम्युअल थांब. मी येतेय.'' आणि मी नदीत उडी मारली.

वेगाने वाहाणाऱ्या वाऱ्याला तोंड देत मी पाणी कापू लागले. माझे कपडे भिजल्यामुळे माझं वजन वाढलं होतं. ''सॅम्युअल'' मी ओरडले. ''इकडे ये.. इकडे.''

शेवटी सॅम्युअलचा एक हात आणि डोकं मला दिसलं. तो प्रचंड घाबरला होता. ''वाचवा.. वाचवा'' तो ओरडला ''तू फक्त साडी पकड.'' मी ओरडून म्हणाले, ''मी तुला खेचते.. घे पकड.. '' आणि मी कमरेत खोचलेली साडी त्याच्याकडे फेकली. परंतु वाऱ्याच्या झोतामुळे ती त्याच्यापर्यंत पोहोचू शकली नाही.

''डुंगडुंग, त्याला पकडायचा प्रयत्न कर.'' लाटांना तोंड देता देता माझे प्राण कंठाशी आले होते. सॅम्युअलला पुढे सरकताना मी पाह्यलं होतं. तो जोरजोराने हातपाय मारू लागला. ''पकड, डुंगडुंग... '' मागून काही आवाज आले. ''हे येशू! तो साडी पकडू शकत नाहीय. तो बुडतोय.'' मी मनात म्हणाले. तेव्हा अंधारात मला मारकसचा आवाज ऐकू आला, ''फेलिसिटॉस... मागे फिर... '' मी मागे फिरलेही असते. पण सॅम्युअलला सोडून परत फिरायची इच्छा नव्हती.

अचानक साडी जोरात खेचली गेली, आणि माझ्या दातात पकडल्यामुळे फाटली गेली. मला कळलं, सॅम्युअल आहे. उरलेलं कापड घट्ट धरून मी परत पोहू लागले. माझे पाय जोरजोरात पाणी मागे फेकत होते. माझे हातपाय सारखे चालत होते. ओठ बंद होते. खूप दमायला झालं होतं. मला वाटलं आता काही मी पुढे जाऊ शकत नाही. जग

शेवटचं बघण्यासाठी मी डोळे उघडले आणि समोर दोन भयभीत डोळे मला बघत होते. ''फेलिसिटॉस.. ये.'' त्यांनी बोलावलं

मी आपली पूर्ण ताकद लावली आणि मारकसकडे हात वळवला. मी काठावर सुरक्षित होते. मग आम्ही सगळ्यांनी मिळून सॅम्युअलला खेचलं. त्याला उलटं करून त्याच्या पोटातलं पाणी काढलं. थंडीने कुडकुडत आम्ही एकमेकांचा आधार घेतला. आणि देवाची प्रार्थना करू लागलो. ''हे परमपिता, परमेश्वरा..'' वाचव.'' परत एकदा हे शब्द आमच्यापर्यंत येऊन पोहोचले. ''वा..च..वा..वा..'' सॅम्युअलने माझ्याकडे पाह्यलं आणि तो कुजबुजला, ''तो किन्डो आहे. तो बुडतोय.'' तिथे एकदम भयानक शांतता पसरली. कोणीही बोलत नव्हतं. वारा पण जणू शांत झाला होता. शेवटी मी हळूहळू मनाची तयारी केली आणि परत एकदा नदीत उडीत मारली.

जेव्हा वादळ संपलं, तेव्हा आम्ही फांदीला सोडून काठावर आलो. काही माणसं तिथे आधीच पोहोचली होती. आम्ही सगळे एकत्र होऊन काही वेळ तिथे बाकी माणसांची वाट पाहू लागलो. कदाचित कुणीतरी येईल. परंतु आमची प्रतिक्षा व्यर्थ होती. परत कुणीही आलं नाही.

# ६. काळोख्या रात्रीतील संघर्ष

१४ फेब्रुवारी १९८० च्या त्या काळोख्या रात्री खूप थंडी पडली होती. चंद्राचा प्रकाश काळ्या ढगांमुळे झाकला गेला होता. उत्तर प्रदेशातील छोटसं हरिजनाचं गाव, रामनगर. रात्रीची वेळ होती. रस्ते सामसूम होते. डोंगरावरून येणारे वेगवान, थंडगार वारे, लाकडाच्या दणकट दारांच्या कड्या वाजवत होते. जणू ते वारे कोणाला हाक मारत होते. मातीच्या आणि दगडाच्या घरातील छोट्याछोट्या खिडक्या तर त्याने एका झटक्यात उघडल्या होत्या, आणि ते घरातील अंगणात फिरत होते.

सतीशकुमार फूलसिंह वाऱ्याचा सूं..सूं आवाज ऐकत पडला होता. थंडीमुळे त्याला कापरं भरलं होतं. स्वयंपाक घराजवळील एका खोलीत, कोपऱ्यात तो रजई पांघरून पडला होता. रजईतून त्याला हवी तेवढी उष्णता मिळत नव्हती. जवळच खाटेवर झोपलेल्या त्याच्या वडिलांनी खोकून कूस बदलली. दुसऱ्या खाटेवर त्याची लहान बहीण सीता उब मिळावी म्हणून आईला बिलगून झोपली होती. तिलाही थंडीने हुडहुडी भरली होती. म्हणून तिची सारखी चुळबुळ चालली होती. आईने काहीतरी पुटपुटत तिला स्वतःच्या घोंगडीत घेतलं.

सतीशजवळ त्याचा मोठा भाऊ विनोद झोपला होता. ''बापरे! किती थंडी आहे!'' तो बडबडला. ''सतीश! पांघरायला अजून काही आहे का?''

सतीशला आणि त्यालाही माहित होतं की, पांघरायला अजून काहीही घरात नव्हतं. त्याचे वडील दिवसभर मजुरी करून काही पैसे मिळवत होते तर दिवसभर रिक्षा खेचून विनोदला काही मिळकत होत होती. एवढ्यात आठ माणसांच्या त्या कुटुंबाला कसंतरी भागवावं लागत होतं. सतीशही मानचंदकाकांच्या गुराढोरांना चरायला घेऊन जात असे आणि त्या मोबदल्यात मानचंदकाका त्याला काही पैसे देत असत. खरं म्हणजे मानचंद

काही श्रीमंत नव्हता. तो आणि त्याची पत्नी दोघेही खूप म्हातारे होते. त्याची मुलं बऱ्याच वर्षांपूर्वी, स्वत:च भाग्य जोखायला, गाव सोडून पाटणा शहरात निघून गेली होती. त्यानंतर मानचंदला आपल्या मुलांचं काय झालं हे आजपर्यंत कळू शकलं नाही. सतीशला परत एकदा हुडहुडी भरली. परंतु ह्यावेळी थंडीमुळे नाही तर अनिश्चित भविष्याचा विचार त्याच्या मनात आल्यामुळे त्याला हुडहुडी भरली होती. खरचं गरिबांचं जीवन किती दु:खद असतं.

अचानक छपरावर धप्प असा आवाज झाला. हा आवाज हवेचा नक्की नव्हता, तर कुणाच्या तरी पायांचा होता. नंतर कुणाच्या तरी कुजबुजण्याचा आवाज आला. ''डावीकडे चला.. पुढच्या घरात.. ऐकलं नाही का मी काय सांगतोय ते.. पुढच्या घरात.''

सतीश चुपचाप पडला होता. ''सतीश!'' पडल्या पडल्या अंधारातच त्याच्या वडिलांनी त्याला हाक मारली, ''तू काही म्हणालास ?'' ''नाही. असं वाटतं बाहेर कुणीतरी असावं.'' सतीश म्हणाला.

''कोण आहे ? कुठायं ?'' आई एकदम ओरडू लागली. ''माझ्या गोठातल्या वासराला कुणीतरी घेऊन जाईल ?''

''अरे कुणी कुत्रा - मांजर असेल.'' त्याचे वडील पुटपुटले. परंतु त्यांनाही कुठेतरी शंका येत होती. ''मी बाहेर कुलूप लावून येतो.''

सतीशला जाणवलं त्याचे वडील अंधारात उठून, पायांनी चाचपडत, चपला शोधत होते. एकाएकी कुणाच्या तरी किंचाळण्याने रात्रीची ती भयानक शांतता भंगली आणि त्याचबरोबर दारावर जोरजोरात काठ्या आपटल्याचा आवाज ऐकू येऊ लागला.

''दार उघडा.. नाहीतर गोळ्या घालू.'' एक घणाघाती आवाज घुमला.

त्या छोट्याश्या खोलीत हलायचीही कुणाची हिंमत झाली नाही. सतीशची आई हळूच म्हणाली, ''बहुतेक डाकू असावेत.'' दुसऱ्याच क्षणी सतीशच्या वडिलांनी दार उघडलं. ''मी पण येतो'' असं म्हणत सतीशही वडिलांबरोबर अंगणात आला.

तेव्हा कसलातरी मोठा आवाज झाला आणि एका बाईच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला - ''वाचवा...वाचवा. डाकू..डाकू.''

सतीशच्या वडिलांनी त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले - ''जरा थांब.'' सतीश

थांबला आणि डोळे फाडफाडून अंधारात डाकूंना शोधू लागला. त्या वेळी प्रत्येक क्षण युगासारखा वाटत होता. अचानक एका काळ्या सावलीने काळोखात मानचंदच्या घरात उडी मारली. '' ते मानचंदकाकांच्या धाब्यावर चढले आहेत.'' सतीशने दबलेल्या आवाजात सांगितले. '' आपण त्यांच्या मदतीला जायला हवंय.''

'' शू..शू. मदतीसाठी आपल्याला आणखीन गावातील लोकांनाही बोलवायला हवंय.''

'' मी जातो.'' सतीश अजून अंगणापर्यंतही पोहोचला नव्हता. तेवढ्यात तीन गोळ्या सुटल्याचा आवाज झाला आणि कुणीतरी ओरडून म्हणालं, '' अरे दुष्टांनो, दार उघडा नाहीतर आम्ही आग लावून टाकू.''

तेव्हा म्हाताऱ्या मानचंदच्या बायकोचा चित्कार ऐकून सतीश सुन्न झाला. भीतीने त्याचे हातपाय गारठू लागले. तरी तो लगेच बाहेर आला. '' बहुतेक डाकूंनी दार तोडलं असावं. आता लवकरच लोकांना मदतीसाठी बोलवायला हवंय.'' असा विचार करून तो भिंतीआड लपतलपत एका गल्लीत आला आणि जोरात पळू लागला.

त्या गल्लीतील प्रत्येक दार त्याने ठोठावलं आणि बातमी दिली, '' उठा..उठा. त्वरा करा. मानचंदकाकांकडे डाकू आलेत... सर्वांनी मदतीसाठी चला.''

काहींनी पटापट दारं उघडली. काही लोकांनी झोपेतच डोळे चोळत खिडकीतूनच विचारलं... '' काय झालं, सतीश ? काय चाललयं हे ? आत्ता जो आवाज तो बंदुकीचा होता ना ?'' '' डाकू..डाकू'' सतीश ओरडला, '' मानचंदच्या घरात आहेत. लवकर बंदुका काढा नाहीतर ते पुरा गाव लुटतील.''

'' बंदुका ?'' एका माणसाने संभ्रमात विचारलं. '' आपल्या गावात बंदुका कुठे आहेत ? आपल्यासारख्या गरिबांकडे स्वसंरक्षणासाठी हत्यार म्हणून फक्त हात आहेत आणि गमावण्यासाठी जीव.''

'' पण तरी आम्ही लढू.'' एक माणूस ओरडला. ''लवकर लवकर काठ्या, लोखंडाच्या कांब्या, सळया, दगडं, गुप्त्या जे मिळेल ते घ्या आणि.. लवकर पळा.''

संपूर्ण गावात डाकू आल्याची बातमी आगीसारखी पसरली. सगळा गाव हातात काठ्या, दगडं, गुप्त्या, कुऱ्हाडी वगैरे घेऊन मानचंदच्या घराकडे धावला. लांबूनच डाकूंचा आवाज ऐकला, '' अरे उंदरांनो, पळून जा...नाहीतर गोळ्या घालू.''

''अरे हे तर आपल्याला गोळ्यांनी मारायची धमकी देताहेत. एकेक करून सगळ्यांना मारून टाकू.'' आणि हवेत दोनदा गोळीबार झाला.

''आपण घराला वेढा घातला पाहिजे.'' सतीशचे वडील म्हणाले, ''कसंही करून घरात शिरायला हवंय.''

''पण कसं ?'' एक किडमिडीत माणूस ओरडला. त्याच्या मिशा खाली पडल्या होत्या. त्याने पातळसा झब्बा पायजमा घातला होता. भीतीने त्याचा थराकाप झाला होता.

''जर त्यांना आपलं नखही दिसलं तर ते आपल्याला गोळी घालून मारून टाकतील.''

''अंधारात ते आपल्याला बघू शकणार नाहीत. काळोखाचा फायदा घेऊन आपण त्यांचा सामना करायला हवाय,'' सतीशचा भाऊ विनोद म्हणाला.

''चला.. पण, अंधारात तर आम्ही तुम्हालाही बघू शकणार नाही आणि त्यांनाही.'' तो अशक्त माणूस चिडून म्हणाला.

ही चर्चा सुरू असताना सतीश तिथून केव्हा निसटला हे कुणालाच कळलं नाही. तो आपल्या घराच्या अंगणाजवळील भिंतीवर मांजरीसारखा दबकत दबकत वर चढू लागला. तिथला एकन्एक कोपरा त्याला परिचित होता. भिंतीवरील वाकड्यातिकड्या आणि खडबडीत दगडांवर लटकत तो कसातरी वर चढला आणि मानचंदच्या अंगणातील दृश्य पाहू लागला. त्याने पाह्यलं, दोन काळ्या सावल्या मानचंदच्या अंगणातील व्हरांड्यातून निघून अंधारात विलीन झाल्या. त्याचवेळी उजवीकडे असलेल्या चिंचेच्या झाडामागे कुणीतरी सर्चलाईट फेकला. त्याच्या तीव्र प्रकाशामुळे सतीशच्या डोळ्यांसमोर काही क्षण अंधार झाला. नंतर तो प्रकाश खाली उतरला आणि दारावर फिरू लागला.

''जर कुणी हाललं तर गोळ्या घालून त्याच्या शरीराची चाळण करून टाकू.'' झाडामागून कुणीतरी ओरडलं.

तो प्रकाश अजूनही इकडेतिकडे फिरत होता. सतीश जर खाली वाकून लपला नसता तर नक्कीच त्याच्या अंगावर प्रकाश पडला असता.

''अरे डाकूंनो ! आज तुम्हांला मजा दाखवतो.'' दात ओठ खात सतीश मनातल्या

मनात म्हणाला. त्याने पाह्यलं, मानचंदच्या व्हरांड्यात जे तीन खांब होते, त्यातील एकाच्या मागून एक सावली निघाली आणि गरजली, '' अरे उंदरांनो.. आपआपल्या बिळात परत जा.''

सतीश आता स्वत:च्या उत्साहाला आवर घालू शकला नाही. हळूहळू तो पुढे सरकू लागला, आणि त्या माणसाकडे बघत राहिला. जो पाय पसरून ऐटीत बंदूक धरून उभा होता.

एकाएकी सर्चलाईटचा प्रकाश सतीशजवळ फिरकला. तो एकदम भिंतीवर झेपावला आणि श्वास रोखून आता काय होतंय ह्याची वाट पाहू लागला. त्याला भीती वाटत होती की, जर तो त्यांच्या नजरेस पडला, तर ते डाकू नक्कीच त्याला गोळी घालतील.

सतीशपासून काही तीन फूटांच्या अंतरावर तो प्रकाश आला आणि परत दाराकडे वळला. सतीश भिंतीच्या कडेला असलेली माती हळूहळू उकरू लागला. आणि जेव्हा तिथली एक वीट हलली तेव्हा हळूच ती त्याने काढली आणि पकडून ठेवली. एक सेकंदही वेळ वाया न घालवता तो उठला, गुडघ्यांवर बसला, नेम धरला आणि त्याच्यापासून काही हात अंतरावर असणाऱ्या बंदूकधारी डाकूवर पूर्ण ताकदीनिशी त्याने वीट फेकली. त्या माणसाला वीट एवढ्या जोरात लागली की तो बंदूकीसहित खाली पडला. अंगणात लपायच्या आधी सतीशने पाह्यलं. तो डाकू जोरजोरात हातपाय आपटून ओरडत होता, '' मारा ह्यांना एकेकाला गोळ्या घाला. नंतर त्याने स्वत:ची बंदूक उचलली आणि त्याने त्याचा खटका दाबला. एक.. दोन.. तीन.. पण बंदूक रिकामी होती.

आपल्या ह्या कल्पनेवर खूष होऊन सतीश खाली उतरला आणि पळत पळत रस्त्यावर आपल्या वडिलांकडे आला. ते म्हणत होते, '' खूप कठीण आहे आपला टिकाव लागणं. ते नऊ डाकू आहेत. त्यांच्याकडे बॅटऱ्या आहेत, बंदुका आहेत. आपल्याकडे तर काहीही नाही.''

'' आपल्याकडे बंदुका नाहीत, बॅटऱ्या नाहीत तर काय झालं. आपण उजेड तर करू शकतो.'' सतीश म्हणाला आणि वाड्याच्या भिंतीला लागून चालू लागला. तो गोठ्यात पोहोचला. तिथे त्याचं वासरू एका कोपऱ्यात घाबरून उभं होतं. सतीशने २ - ३ गवताचे भारे उचलले आणि ते एकत्र बांधून एक मोठा भारा त्याने बनवला. नंतर त्याने वासराच्या

अंगावरून हात फिरवला आणि चपळाईने रस्त्यावर आला, इकडे मानचंदच्या दारासमोर गावकऱ्यांची गर्दी जमली होती.

कत्तारसिंह आपली गुप्ती फिरवत म्हणाला, '' विटा, दगडं जे काही मिळेल ते गोळा करा. जर गावाला वाचवायचं असेल तर धैर्याने काम घ्यायला हवंय.''

'' काका, काडेपेटी आहे ?'' सतीशने त्यांना विचारलं.

'' काडेपेटी ?'' कत्तारसिंहने चिडून खिसे चाचपले. मग काडेपेटी सतीशला देऊन मोठ्याने ओरडला, ''दार तोडा वर चढून जा.. चला.. अरे तुम्ही सगळे असे गिधाडासारखे काय पाहाताय ?''

''मी गावासाठी जरूर लढेन.'' एक माणूस ओरडला.

'' आणि मी पण.... !'' सतीशचे वडील म्हणाले.

'' मी सुद्धा... '' सतीश म्हणाला आणि आपल्या अंगणाकडील भिंतीकडे गेला. अतिशय सावधानतेने त्याने गवताच्या भाऱ्याला आग लावली. क्षणात गवत भरभर जळू लागले आणि जळताना आवाज होऊ लागला. धुराने त्यांच्या डोळ्यांची आग होऊ लागली. त्याने भिंतीवरून वाकून खाली मानचंदच्या अंगणात पाह्यलं. ह्यावेळी डाकूंनी सर्चलाईट लावलेला नव्हता.

'' आता उशीर करायला नकोय.'' सतीशने असा विचार केला आणि तो पुढे सरकला. जळता भारा त्याने जोरात मानचंदच्या अंगणात फेकला.

त्या अंधारात तो जळता गवताचा भारा आकाशातून तुटणाऱ्या ताऱ्याप्रमाणे भासला. आणि संपूर्ण अंगणात उजेड पडला. डाकू आपआपल्या परीने जागा मिळेल तिथे लपू लागले. कोणी झाडामागे, खांबामागे, कुणी पेट्यांमागे लपू लागले. एक डाकू ओरडला, '' पकडा ह्याला आणि गोळी घाला.''

सतीश पळाला आणि त्याला मारण्यासाठी गोळ्यांचा पाऊस पडत होता.

'' आह '' एक दाढीवाला तगडा माणूस व्हरांड्यात कण्हला, '' ह्याला पकडा.'' आणि त्याने त्याची बंदूक त्याच्या साथीदाराला दिली. सतीशला समजलं हा तोच माणूस आहे ज्याला त्याने मारून खाली पाडलं होतं.

सतीश अतिशय चपळतेने डाव्या बाजूला जो खिलप्यांचा डोंगर होता त्या ढिगाऱ्यात त्याने स्वत:ला लपवून घेतलं. त्याला श्वास घ्यायला त्रास होऊ लागला आणि त्याच्या

शरीराला नंतर सुया टोचताहेत असा त्याला भास होऊ लागला. दुसऱ्याच क्षणी खिलप्यांच्या ढिगाऱ्यावर गोळ्यांचा वर्षाव झाला आणि सगळं काही शांत - शांत झालं. सतीश आत सुरक्षित होता.

'' ही आग इथून उचला. विझवून टाका हिला.'' एक डाकू ओरडला. '' जर ह्यांनी आग लावली तर सगळंच मुसळ केरात जाईल.'' स्वत:ला सावरून सतीश उभा राहिला आणि मानचंदच्या घराकडे नीट पाहू लागला. एक डाकू, ज्याने काळा झब्बा आणि पायजमा घातला होता, आग विझविण्यासाठी पुढे सरकू लागला. एकाएकी त्याच्यावर वीटेचा एवढा जबरदस्त मारा झाला की तो खाली पडला. सतीशने वळून पाह्यलं ते किशनकाका होते. त्यांनी हा वार केला, '' मारा मारा.'' सतीशचे वडील ओरडले. सतीशची हिंमत ह्यामुळे आणखीनच वाढली. मारायला काही सापडतंय का हे शोधण्यासाठी तो अंधारात हाताने चाचपडू लागला. त्याच्या नशिबाने त्याच्या हाती काही विटा लागल्या. आता तो बेधडक उभा राहिला. त्याने पाह्यलं तो डाकू उठून परत आग विझवायला जात होता. म्हणून त्याने परत नेम धरला आणि एवढ्या जोरात वीट फेकली की डाकूचा जबडाच तुटला, आणि मग तो तडफडत खाली पडला. अतिशय चिडून त्याने सतीशकडे पाहिलं. जळणाऱ्या गवताच्या भाऱ्याच्या प्रकाशात त्या दोघांच्या नजरा एकमेकांना भिडल्या. सतीशने ह्या आधी कधीही कुणाच्याही डोळ्यात एवढी घृणा किंवा आग पाहिली नव्हती. आता त्याने दुसरी वीट उचलली, ह्यावेळी त्याने डाकूच्या डोक्यावर नेम धरला आणि डाकू चक्कर येऊन खाली पडला.

आता सतीशचा धीर वाढला होता.

'' मारा..मारा '' तो ओरडला. त्याने तिसरी वीट उचलली आणि बैलगाडीमागे लपलेल्या डाकूवर नेम धरला. पण आगीच्या प्रकाशात डाकूंनी त्याला पाहिलं होतं. तिसरी वीट तो फेकणार एवढ्यात एक गोळी सणसणत आली आणि त्याच्या उजव्या गालाला चाटून गेली.

सतीश खाली पडला, त्याच्या मुठीत अजूनही वीट होती.

'' सतीश.. बाळ सतीश '' एक आवाज आला. सतीशने आपल्या वडिलांची हाकही ऐकली नाही की गावकऱ्यांचा आक्रमणकारी आवाजही ऐकला नाही. जे आता चारही बाजूंनी अंगणात लपलेल्या डाकूंवर हल्ला करत होते. त्याला फक्त एवढंच

आठवतंय की त्याचा मोठा भाऊ त्याला खेचून एका खोलीत घेऊन गेला आणि भयभीत होऊन त्याच्याकडे पाहू लागला. ह्यानंतर त्याची शुद्ध हरपली अणि त्याला पुढचं काहीही आठवत नाही.

त्याला हेही माहीत नाही की मानचंदच्या अंगणात त्या काळोख्या रात्री गावकऱ्यांमध्ये आणि डाकूमध्ये केवढा भयानक संघर्ष झाला होता. गावकऱ्यांनी दगड, विटा, गुप्त्या आणि काठ्यांनी दोन तास डाकूंचा सामना केला. डाकूंना त्यांनी सळो की पळो करून सोडलं. डाकूंच्या सरदाराचे त्यांनी हातपाय बांधून ठेवले. नंतर पोलिस आले आणि डाकूंना पकडून घेऊन गेले. परंतु रामनगरचे रहिवासी ह्या धाडसी मुलाला, सतीशकुमारला, कधीही विसरणार नाहीत, ज्याने गावाला वाचविण्यासाठी स्वत:चा उजवा डोळा गमावला.

**सयाल लहानुभाऊ भोयाचा** जन्म १ जून १९६७ साली गुजराथमध्ये झाला. सयाल ४ थी पर्यंत शिकली आहे. ती गुजराथी बोलते. तिला दोन भाऊ आणि एक बहीण आहे. तिचे वडील मजुरी करतात. सयालचे छंद संगीत, वाचन आणि खेळणे.





**सी. गोविंदन्चा** जन्म १५ एप्रिल १९६६ मध्ये तमिळनाडूत झाला. कुस्बपल्ली शाळेत त्याचं शिक्षण झालं. तो तमिळ आणि इंग्रजी बोलतो. त्याला सहा भाऊ आणि एक बहीण आहे त्याचे वडील मजूरी करतात. त्याचे छंद वाचन, संगीत आणि खेळणे.

**सोनिया सिन्हाचा** जन्म ३ नोव्हेंबर १९६९ मध्ये बिहारमध्ये झाला. सोनियाचं शिक्षण सेंट, जोसेफ पटणा ह्या शाळेत झालं. ती हिंदी आणि इंग्रजी बोलते. तिला एक भाऊ आणि एक बहीण आहे. तिचे वडील बालरोगतज्ज्ञ होते. ते अग्नी दुर्घटनेत वारले. ह्याविषयी ह्या गोष्टीत नमूद केलं आहे. सोनियाचे छंद - वाचन आणि वेगवेगळे खेळ.



**शत्रुघ्नलाल साहूचा** जन्म १६ डिसेंबर १९६६ मध्ये मध्यप्रदेशमध्ये झाला. शत्रुघ्न दुर्गच्या नेहरू शाळेत शिकला. तो छत्तिसगढी आणि हिंदी बोलतो. त्याच्या आईवडिलांचा मृत्यू झाल्यामुळे जिल्हा साहू संघाने त्याला दत्तक घेतलं होतं. त्याचे छंद - वाचन, फिरणे, खेळणे आणि लोकसंगीताच्या कार्यक्रमात भाग घेणे. त्याची इंजिनिअर व्हायची इच्छा आहे.





**फेलिसिटॉसचा** जन्म २१ जून १९५० मध्ये ओरिसात झाला. S.S.C. नंतर तिने राजकीय चिकित्सालय, राऊरकेला इथे नर्सचे प्रशिक्षण घेतले. ती उडिया, हिंदी आणि इंग्रजी बोलते. तिला दोन भाऊ आणि पाच बहिणी आहेत. तिचे वडील शेतकरी आहेत. तिचे छंद - संगीत आणि हस्तकला.

**सतीशकुमार फूलसिंहचा** जन्म १९६८ साली उत्तरप्रदेशमध्ये झाला. तो शिकला नाही. गुरंढोरं चारून कुटुंबाला आर्थिकदृष्ट्या मदत करत आला आहे. तो हिंदी बोलतो. त्याला दोन मोठे भाऊ आणि एक बहीण आहे. त्याचे वडील मजुरी करतात.



